# वीरशैवांची स्फुट कविता

पाठ्यपुस्तक
वीरशैव सिद्धान्त प्रवीण परीक्षा

संपादक

**शांतितीर्थ संगय्या स्वामी**

**श्रीकाशीजगद्गुरू विश्वाराध्य वीरशैव विद्यापीठ**
जंगमवाडी मठ, वाराणसी

## पाठ्यपुस्तक समिती


**शांतितीर्थ संगय्या स्वामी**

एम.ए., बी.एड.

औरंगाबाद / चरभाष 9850178576

**पं. शिवाप्पा नागनाथअप्पा खके**

बी.एस्सी., बी.एड.

चारठाणा, जि. परभणी / चरभाष 9421086848

**डॉ. शेषनारायण देवाप्पा पसारकर**

एम.ए., पीएच.डी.

केकतउमरा, ता.जि. वाशीम / चरभाष 9420780570

**डॉ. अनिल काशीनाथ सर्जे**

एम.ए., पीएच.डी.

सोलापूर / चरभाष 9823919591

**स्वाती मनोहर साखरकर**

बी.ए. (मराठी), एम.एस्सी., बी.एड्.

कारंजा (लाड), जि. वाशीम / चरभाष 9421391011


---


प्रकाशक

राजेंद्र नागनाथ बलसुरे, सचिव, श्रीकाशीजगद्गुरू विश्वाराध्य वीरशैव विद्यापीठ,
११९, ओम नम: शिवाय नगर, हत्तुरे नगर, मजरेवाडी, सोलापूर ४१३२२४
संपर्क : चरभाष 96044 28471

संगणकीय अक्षरलेखन

सौ. उषा पसारकर, 'पसारकर भवन'. केकतउमरा, ता.जि. वाशीम ४४४५०५

मुद्रणस्थळ : जयंती प्रिंटर्स, ३७४, उत्तर कसबा, सोलापूर ४१३ ००७

आवृत्ती पहिली २००३, आवृत्ती दुसरी २००५,
आवृत्ती तिसरी २०१०, आवृत्ती चौथी : ऑगस्ट २०१९

मूल्य : ४० रुपये

# निवेदन

परमपूज्य श्रीकाशीज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य मार्गदर्शनाखाली, 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य वीरशैव विद्यापीठ, जंगमवाडी मठ, वाराणसी' यांच्या वतीने वीरशैव धर्माचा इतिहास, साहित्य व तत्त्वज्ञान यासंबंधी तीन परीक्षा घेण्याचे आयोजित केलेले आहे.

वीरशैवधर्म अत्यंत प्राचीन आहे. त्याचे तत्त्वज्ञान अत्यंत उदार, व्यापक व सर्वसमावेशक आहे. अशा तत्त्वज्ञानाचा, ग्रंथकार व त्यांच्या ग्रंथांचा, शिवशरण व संत यांच्या जीवनाचा तसेच त्यांच्या साहित्यकृतींचा जिज्ञासूंना व विद्यार्थि-विद्यार्थिनींना सुलभ व योग्य पद्धतीने अभ्यास करता यावा आणि त्याचे यथोचित उद्बोधन व्हावे हाच परीक्षा आयोजित करण्यामागचा उद्देश आहे.

या परीक्षेसाठी १. वीरशैव पंचपीठे : परंपरा आणि कार्य, २. वीरशैवांची स्फुट कविता व ३. पंचाचार ही तीन पाठ्यपुस्तके अत्यंत सुबोध व सुगम भाषेत लिहून मुद्रित केली आहेत.

'वीरशैव पंचपीठे : परंपरा आणि कार्य' या पहिल्या पाठ्यपुस्तकात वीरशैव पंचपीठांची, त्यांच्या परंपरा आणि कार्याची सविस्तर माहिती विशद केली आहे. पुस्तकाच्या शेवटी प्रत्येक प्रकरणावर आधारलेली नमुना प्रश्नपत्रिका दिलेली आहे. नमुना प्रश्नपत्रिकांच्या वाचनाने परीक्षार्थींना प्रश्नांच्या स्वरूपाची आणि गुणविभागणीची स्पष्ट कल्पना येऊ शकते. 'वीरशैवांची स्फुट कविता' या दुस-या पाठ्यपुस्तकात विविध वीरशैव कवींच्या स्फुट रचना-- पदे (५), पाळणे (५), अष्टके (३), आरत्या (५), पोवाडे (१), गीते (८), कटाव (१), वडप (५), भारुडे (७) इ. ४० रचना दिलेल्या आहेत. त्यावरून वीरशैव कवींच्या रचनेचे विविधांगी स्वरूप लक्षात येईल. कवीचा संक्षिप्त परिचय, कठीण शब्दांचे अर्थ, आवश्यक तेथे टीपा दिलेल्या आहेत. प्रत्येक स्फुट रचनाप्रकाराच्या शेवटी प्रश्नावली दिलेली आहे. पुस्तकात प्रश्नपत्रिकेचे स्वरूपही दिलेले आहे. तिस-या 'पंचाचार' या पाठ्यपुस्तकात वीरशैव धर्मातील पाच आचारांच्या तात्त्विक स्वरूपाची माहिती सुबोध भाषेत दिलेली आहे. प्रत्येक प्रकरणाच्या खाली प्रश्नावली दिलेली आहे. पुस्तकाच्या शेवटी प्रश्नपत्रिकेचे स्वरूप दिलेले आहे. प्रश्नावली व प्रश्नपत्रिकेचे स्वरूप यांच्यामुळे परीक्षार्थींना प्रश्नांच्या स्वरूपाची आणि गुणविभागणीची सहज कल्पना येऊ शकते.

परीक्षेत प्रश्नावली आणि नमुना प्रश्नपत्रिकेतील प्रश्नच विचारले जातील असे नाही. प्रश्नावली मार्गदर्शनपर आहे याची परीक्षार्थींनी नोंद घ्यावी.

**रे. रा. मगाई** सचिव, परीक्षा समिती

## प्रश्नपत्रिकेचे स्वरूप

## प्रश्नपत्रिका २ : वीरशैवांची स्फुट कविता

| प्र.क्र. | प्रश्नप्रकार | गुण | किती प्रश्न सोडवावेत? |
|---|---|---|---|
| १. | खालील प्रश्नांची प्रत्येकी ८ ते १० वाक्यांत उत्तरे लिहा. | २० | सहापैकी चार सोडवावेत. (प्रत्येकी ५ गुण) |
| २. | पुढील प्रश्नांची प्रत्येकी २० वाक्यांत उत्तरे लिहा. | १० | दोनपैकी एक सोडवावा. (प्रत्येकी गुण १०) |
| ३. | (अ) पुढील वाक्यातील रिकाम्या जागी कंसात दिलेल्यापैकी योग्य शब्द भरून वाक्ये पुन्हा लिहा. | ५ | पाचपैकी पाचही सोडवावेत. (प्रत्येकी १ गुण) |
| | (ब) खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा. | ५ | पाचपैकी पाचही सोडवावेत. (प्रत्येकी १ गुण) |
| ४. | खालील विषयावर प्रत्येकी १० ते १२ वाक्यांत टीपा लिहा. | १० | चारपैकी दोन सोडवावेत. (प्रत्येकी ५ गुण) |

# १ पद

ओवीग्रंथ, अभंगांबरोबरच वीरशैव संतांनी पदरचना केली आहे. त्यात प्रामुख्याने मन्मथस्वामी, लक्ष्मणमहाराज, बसवलिंग, महादेवप्रभू, गंगाधर शिवाचार्य व सदानंदबुवा जोडजवळेकर यांचा समावेश होतो.

पद हा अभंगासारखा गेय प्रकार असून पदात पहिल्या चरणात ध्रुवपद असते. पद अभंगासारखेच गाईले जाते. मन्मथस्वामी वीरशैवातील पहिले पदरचनाकार आहेत.

## १. गुरुराज माऊली

**मन्मथस्वामी** (इ. स. १५६१–१६१३) : मराठीतील पहिले लावणीकार. वीरशैवांतील पहिले अभंगकार, पदकार. यांचे स्वयंप्रकाश, अनुभवानंद, गुरुगीता, ज्ञानबोध व परमरहस्य हे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. यांची समाधी कपिलधार (जि. बीड) येथे असून कार्तिक शु. पौर्णिमेला या ठिकाणी फार मोठी यात्रा भरते.

प्रस्तुत पदात गुरुदर्शनाची ओढ भक्ताला लागल्याचे वर्णन असून त्याला ज्ञानदुधाची आस लागली आहे, असे वर्णन केलेले आहे.

गुरुराज माऊली ग, माय माझे गुरुराज माऊली।।धृ.।।
वत्सालागी धेनु जैसे उचलित ये पाऊली।।१।।
नको अंत पाहू माझा त्वरीत ये सुखकर साऊली।।२।।
ज्ञानदुधाची आस लागली करी कृपेची साऊली।।३।।
मन्मथ शिवलिंग वाट पाहे सत्वरी ये धाऊनी।।४।।

**शब्दार्थ :**

आस = उत्कंठा.

## २. सख्यांनो, प्या नामामृत सार

**लक्ष्मणमहाराज** (इ. स. १८०८–१८७८) : लक्ष्मण कृष्णाप्पा रऊळगावकर हे यांचे पूर्ण नाव. साखरखेर्डा (जि. बुलडाणा) येथील श्रीपलसिद्ध मठाचे हे शिष्य. पलसिद्धांच्या प्रेरणेने हाती लेखणी घेऊन लक्ष्मणमहाराजांनी सिद्धेश्वरमाहात्म्य, सिद्धस्तोत्र, परमेश्वरस्तोत्र

आदी ओवीरचना, आरत्या, भारुडे, मराठी-हिंदी पदे आणि ४००० अभंग लिहिले. यांची संपूर्ण रचना २००१ साली 'श्री लक्ष्मण गाथा' या नावाने प्रसिद्ध झाली आहे.

या पदात नामस्मरणाचे महत्त्व वर्णन केलेले आहे. नामस्मरण हे सोपे व सुलभ साधन असून 'प्रथम नामस्मरण करा, मग सुखाने संसार करा' असा संदेश यातून दिला आहे.

सख्यांनो, प्या नामामृत सार। मग सुखे करा संसार।।धृ.।।
असंख्य दोषी हिंसक तरले। ब्रह्महत्यारी फार।।१।।
सुलभ साधन अति सोपे रे। भवसिंधु व्हाल पार।।२।।
अक्षयी स्मर हा शिवनामाचा। प्रेमे करा उच्चार।।३।।
लक्ष्मण म्हणे प्रेमाचे सखे व्हाल। जैसा हा गणेश-कुमार।।४।।

**शब्दार्थ :**
नामामृत = नामरूपी अमृत. ब्रह्महत्यारी = अत्यंत पापी मनुष्य. भवसिंधु = संसाररूपी समुद्र, जन्ममृत्यूचे चक्र. गणेश-कुमार = गणपती व कार्तिकस्वामी.

## ३. साधुसंगती गोड झाली

**महादेवप्रभू** (इ. स. १८२४–१८९८) : सातारा जिल्ह्यातील जांब येथे माहेश्वरकुळात जन्म. हे राजयोगी होते. १२ वर्षे तीर्थयात्रा केल्यानंतर त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला. त्यांनी शिवभक्तिपर अभंग, पदे, आरत्या, हिंदी पदे, भारुडे रचली आहेत. दरवर्षी चैत्र शु. ५ ला जांब येथे त्यांच्या पुण्यतिथीनिमित्त यात्रा भरते. त्यांचा बराच शिष्यपरिवार आहे. महादेवप्रभूंची रचना गोड व प्रासादिक असून त्यांनी अनेक कथात्मक अभंगही लिहिले आहेत. या पदात साधुसंगतीने ब्रह्मपदाची जोड कशी मिळाली, याचे वर्णन नादमधुर शब्दांत केले आहे.

साधुसंगती गोड, झाली ब्रह्मपदाची जोड।।धृ.।।
षड्रिपुकानन कंटक होते ज्ञानकुठारे तोड केली।।१।।
अमृतबीज रोपुनिया जेणे कृपाघनाने वाढविली।।२।।
प्रभू महादेव म्हणे शीतळ छाया स्वात्मसुखाची झोप आली।।३।।

**शब्दार्थ :**

ब्रह्मपद = मोक्ष. षड्रिपू = काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे सहा शत्रू. कानन = अरण्य. कंटक = काटे. ज्ञानकुठारे = ज्ञानरूपी कु-हाडीने. कृपाघन = मेघाप्रमाणे कृपेचा वर्षाव करणारे (संत). अमृतबीज = भक्तीचे अमृतासारखे बीज. स्वात्मसुख = आत्मज्ञानाने मिळणारे सुख.

## ४. देह जायाचा जायाचा

**गंगाधरस्वामी वडांगळीकर** (इ. स. १८२७–१९०९) : नाशिक जिल्ह्यातील वडांगळी मठावर हे पीठाधीश होते. यांनी वयाच्या ४० व्या वर्षी शिक्षण सुरू करूनही पुढे चांगली गती मिळविली. वीररहस्य (पारमेश्वर-आगमावर टीका), शिवविजय (शंकरसंहितेवर टीका), शिवकथामृत (केदारखंडावर टीका) मदनांतकस्तोत्र, त्रिपुंड्रमाहात्म्य व सुमारे १००० अभंग, पदे व भारुडांचा गाथा याचे लेखन केले. वीरशैवधर्मजागृतीसाठी शिवनामसप्ताहांचे आयोजन केले.

देह हा क्षणभंगुर आहे; 'माझे माझे' म्हणण्याचे सोडून द्या. नामस्मरण करा. नाहीतर जीवनाची फजिती होईल, असे वर्णन गंगाधरस्वामींनी या पदात केले आहे.

देह जायाचा जायाचा। कदापि नाही राह्याचा।।धृ.।।
पाचाचा आणिला उसना। शेखी ज्याचा तो नेईल जाणा।।१।।
आप तेज वायू गगन। याचे औंश नेले याने।।२।।
पृथ्वीचा अंश नेमस्त। प्रेत राहिले पृथ्वीत।।३।।
माझे माझे म्हणून। प्राण्या व्यर्थ होईल शीण।।४।।
गंगाधर नामाते। स्मरा नका होऊ फजित।।५।।

**शब्दार्थ :**

पाचाचा = पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश या पंचतत्त्वांचा. शेखी = शेवटी. नेमस्त = निश्चित.

## ५. जय जय पंचाचार्य गुरुवृंद

**सदानंद** (अंदाजे इ. स. १८८०–१९४०) : सदानंदबुवा जोडजवळेकर यांचे सदानंद हे टोपण नाव व बंडप्पा करपे मूळ नाव होते. हे कीर्तनकार असून यांचे भाषेवर प्रभुत्व

होते. त्यांनी अभंग, भारुडे, पदे, आख्याने, पाळणे, आरत्या रचल्या आहेत. यांची बरीच रचना अप्रकाशित आहे. कीर्तनकार असल्यामुळे यांचे काव्य ओजस्वी व रसाळ बनले आहे. संस्कृतप्रचुर व नादमधुर शब्दांत त्यांनी पंचाचार्यांचे वर्णन या पदात केले आहे.

जय जय पंचाचार्य गुरुवृंद।।धृ.।।
वीरशैव मत स्थापन करूनी। उद्धरिले गणवृंद।।१।।
सेवा करिती नित्यचि तुमची। त्रिसहस्त्र चरवृंद।।२।।
सुरनर मुनिजन स्तोत्रे गाती। तुटावया भवबंध।।३।।
कीर्ति गाता शेषही शिणला। मी वर्णू किती मतिमंद।।४।।
पदकमलावरी भ्रमरन्यायपरी। मोहित हा सदानंद।।५।।

**शब्दार्थ :**

पंचाचार्य = रेणुकाचार्य, मरुळाराध्य, एकोरामाराध्य, पंडिताराध्य व विश्वाराध्य हे वीरशैवांचे पाच आचार्य. गणवृंद = शिवगणांचा समुदाय. त्रिसहस्त्र चरवृंद = तीन हजार जंगमांचा समूह. भवबंध = संसाराचे बंधन. भ्रमरन्यायपरी = कमळावर भुंगा ज्याप्रमाणे लुब्ध होतो त्याप्रमाणे.

## प्रश्नावली

प्रश्न १ : खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्याः–

१. वीरशैवातील पहिल्या पदकाराचे नाव काय?
२. साधुसंगतीमुळे कशाची जोड होते?
३. देह कोणाकडून उसना आणला?
४. पंचाचार्यांची नावे सांगा.
५. सदानंदबुवा पंचाचार्यांच्या पदकमलावर कोणाप्रमाणे मोहित होतात?

प्रश्न २ : रिकाम्या जागी कंसांत दिलेल्या शब्दांपैकी योग्य शब्द भरून पंक्ती पुन्हा लिहाः–

१. ज्ञानदुधाची ...... लागली। करी कृपेची साऊली।। (आस / वास)
२. सुलभ साधन अति सोपे रे। ...... व्हाल पार (करुणासिंधू / भवसिंधू)
३. ...... कंटक होते। कृपाघनाने वाढविली (कानन / आनन)
४. पृथ्वीचा अंश ......। प्रेत राहिले पृथ्वीत।। (समस्त / नेमस्त)
५. वीरशैवमत स्थापन करूनि उद्धरिले ...... (जनवृंद / गणवृंद)

प्रश्न ३ : खालील प्रश्नांची प्रत्येकी ८ ते १० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. मन्मथस्वामींनी 'सत्वरी ये धाऊनी' असे कोणास व का म्हटले आहे?

२. नामस्मरणाचे महत्त्व 'सख्यांनो, प्या नामामृत सार' या पदाच्या आधारे स्पष्ट करा.

३. महादेवप्रभू यांच्या दृष्टीने स्वात्मसुखाची झोप कशामुळे आणि कशा प्रकारे येते?

४. 'देह जायाचा जायाचा' असे गंगाधरस्वामी का म्हणतात? आपली फजिती टाळण्यासाठी त्यांनी कोणता उपाय सुचविला आहे?

५. 'जय जय पंचाचार्य गुरुवृंद' हे पद कोणी लिहिले आहे? कवित्वाशिवाय त्यांच्याठायी आणखी कोणता विशेष गुण होता? त्यांच्या वरील पदाच्या आधारे पंचाचार्यांचे तुमच्या शब्दांत वर्णन करा.

प्रश्न ४ : खालील प्रश्नांची प्रत्येकी २० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. 'पद' या कविताप्रकाराची वैशिष्ट्ये सांगून आपल्या पाठ्यपुस्तकातील पदांपैकी कोणत्याही दोन पदांतील विषय-आशयाचे वर्णन करा.

२. 'गुरुराज माऊली' आणि 'सख्यांनो, प्या नामामृत सार' या दोन्ही पदांतील विषय आणि आशय यांतील फरक स्पष्ट करा.

❑❑

# २ पाळणा

पाळणा हे लोकगीत प्राचीन काळापासून सर्वज्ञात आहे. मूलतः हे स्त्रीगीत. पण अनेक प्रथितयश कवींनी पाळणे रचलेले आहेत. देवदेवतांचे, साधुसंतांचे व थोर पुरुषांचे पाळणे रचले वा म्हटले जातात. वीरशैव कवींनी पण मोठ्या प्रमाणावर पंचाचार्य, महात्मा बसवेश्वर, अक्कमहादेवी, मन्मथस्वामी आदींवर पाळणे रचून आपला भक्तिभाव प्रकट केला आहे. पाळणा गेय असून साधारणपणे जन्मापासून बारा दिवसांपर्यंतचे बाळाचे कर्तृत्व त्यात वर्णिलेले असते. बाराव्या दिवशी नामकरणाच्या वेळी स्त्रिया हे गीत म्हणत बाळाला पाळण्यात टाकून त्याचे नाव ठेवतात .

## १. पाळणा पंचाचार्यांचा

**सांब** (इ. स. १८९२–१९२७) : सांब बापूआप्पा ब्याळे हे यांचे पूर्ण नाव. राहणार जोडजवळे (ता. जि. लातूर). यांचे वास्तव्य लातूर येथे व्यापाराच्या निमित्ताने होते. शिक्षणाबद्दल त्यांना ओढ होती. त्यांनी पदे, आरत्या, आर्या, पाळणे इ. रचना केली. त्यांचे लेखन फुटकळ स्वरूपात मुक्तगुच्छमाला मासिक (वडांगळी, जि. नाशिक), शिक्षणप्रकाश मासिक (लातूर) इत्यादीतून प्रकाशित झाले आहे. 'मंगलमय महालिंगोद्‌भव...' ही त्यांची पंचाचार्यांवरील आरती सर्वदूर महाराष्ट्रात प्रसिद्ध आहे.

सांब बापूआप्पा ब्याळे यांनी लिहिलेल्या पाळण्यात पाचही आचार्यांचे वर्णन त्यांच्या वैशिष्ट्यांसह आले आहे. प्रत्येकाची वैशिष्ट्ये नेमकेपणाने टिपली आहेत. अनुप्रासामुळे काव्याला गोडवा आला असून मध्येच काही ठिकाणी चाल बदलल्याने काव्य वैचित्र्यपूर्ण बनले आहे.

बाळा जो जो रे जगद्‌गुरू आचार्या। दर्शने ही पावन काया।।धृ.।।
ब्रह्मा विष्णु हे स्तविती। ताप शमाया। पावन त्या करिता सदया।।
(चाल) आद्य रेणुक जगी अवतरले। अगस्तीसी उपदेशिले।
नास्तिका शासन केले। पिण्या बोधामृत। आले शरण तव पाया।
दिले लिंग शंकराचार्या।।१।।

मरुळाराध्य दुजे वटक्षेत्री अवतरले। बहु शरणांगत उद्धरिले।
सद्‌भक्तांचे हो प्रेमे पालन केले। दुष्टासी शासन पहिले।
(चाल बदल) दैदिप्य मूर्ती। तव साजे। पाहुनिया रतिपति लाजे।

मुनी धावती सोडूनी काजे। पहाता शशिवदना, लज्जित होतसे माया।
रुंजी घालिती पदकमली या।।२।।

हिमवत्केदारी सिंहासन स्थापिले। एकोराम तृतीय गण आले।
शोभे त्रिपुंड्रांनी रुद्राक्षधारण केले। वेणुदंड हातामध्ये धरिले।
(चाल) वैराग्यवृत्तीचा बाणा। लिंगांगी समरस ज्ञाना।
उपदेशी नित्य भक्तांना। त्रिविध तापाचे क्षालन केले सखया।
दुस्तर भवसिंधु तराया।।३।।

परशिव ब्रह्मरूपा भक्तकार्या तू करिसी। पंडिताराध्य नाम हे तुजसी।
वीरशैवमता अखंड चालना देसी। षट्स्थळा नित्य बोधीसी।
(चाल) श्रीशैलावरती राहणे। ऋषिमुनिजन लीन तव ध्याने।
गंधर्व स्तविती गाणे (चाल) ब्रह्मरूपीचा खेळ खेळसी जगी या।
सारूनी दूर ती माया।।४।।

विश्वभूतदया उद्भवली तव चित्ती। म्हणोनिया येणे भूवरती।
विश्वाराध्य मुखे म्हणता दोष न रहाती।
असंख्य भक्तजन तरती। (चाल) विश्वक्लेश हराया सजला।
शोभसी काशीपीठाला। करी धारिसी बिल्वदंडाला।
(चाल) भक्तगण धावती प्रेमे चरणी रमाया।।
सांबाची करी पावन काया।।५।।

**शब्दार्थ :**

ताप शमाया = आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक ह्या तीन तापांचे निरसन व्हावे यासाठी. वटक्षेत्री = उज्जयिनी क्षेत्रात. रतिपती = रतीचा पती अर्थात् कामदेव. पहाता शशिवदना = चंद्रासारख्या मुखाला पाहून. लिंगांगी ज्ञान = लिंग (शिव) आणि अंग (जीव) यांच्या एकत्वाचे ज्ञान. वेणुदंड = वेळूचा दंड, हा दंड केदारजगद्गुरूंच्या हाती असतो. क्षालन = निरसन. दुस्तर भवसिंधू = कठीण असा संसाररूपी सागर.षट्स्थळे = भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण व ऐक्य ही सहा स्थले. ब्रह्मरूपीचा खेळ खेळसी = ब्रह्मचिंतनात निमग्न होऊन, विश्व ही ईश्वराची क्रीडा आहे अशा भावनेने वागणे. विश्वभूतदया = विश्वातील सर्व प्राणिमांत्रांविषयी दयाभावना. विश्वक्लेश = जगातील दुःखे. सजला = सिद्ध झाला. बिल्वदंड = बेलाच्या वृक्षापासून बनविलेली काठी, दंड. हा दंड काशीजगद्गुरूंच्या हातात असतो.

# २. बसवेश्वरांचा पाळणा

**सुमंत** (इ. स. १८८१-१९३९) : अप्पाराव धुंडिराज मुरतुले हे यांचे पूर्ण नाव. जन्म कागल, जि. कोल्हापूर. कोल्हापूर येथे खाजगी नोकरी. १८९७ ते १९३५ हा यांच्या काव्यलेखनाचा काळ. 'माझे दुर्दिन', 'कन्यादानफळ' आणि 'शोकतरंगिणी' ही दीर्घ काव्ये व 'मौक्तिकमाला' आणि 'भवनिनाद' हे कवितासंग्रह त्यांच्या नावावर आहेत. यांची बरीच कविता धुळ्याच्या 'काव्यरत्नावली' या मासिकातून प्रसिद्ध झाली आहे. हे एक कसलेले कवी असून केशवसुत, रेव्हरेंड टिळक यांचे समकालीन होते.

सुमंत यांनी लिहिलेला बसवेश्वरावरील हा पाळणा काव्यदृष्ट्या उच्च दर्जाचा आहे. अलंकाराने नटूनही सुलभ, सुगम व सुभग अशी ही रचना आहे.

श्रीनंदीश्वर अवतारा। जो जो जो बसवकुमारा।।धृ.।।

वेदान्ती वाखाणियली। जी वीरशैवमत महती।
तिज काळगतीने आली। मृतकळा छळाने जगती।
कर्माने गिळिले ज्ञाना। तम जमले तेजाभोवती।
निद्रेचा अंमल चढला। जन अवनत घोरत पडला।
तुजचि मात्र जागर घडला। लिंगायत धर्मोद्धारा।। बाळा जो जो।।१।।

हिंगुळी पुरी कर्नाटी। द्विज मादिराज जो राही।
मादांबा त्यांची कांता। सुतचिंतादग्ध सदा ही।
शिवभक्तिविणे अनुरक्ती। धरिली न कधी उभयाही।
पाहुनी निपुत्रिक त्यांना। अवतरसी तू त्या स्थाना।
ताराया जड जीवांना। निजजन्म वेंचिसी सारा।। बाळा जो जो।।२।।

संगमेशरूपा धरूनी। प्रभू शंकर तव गुरू झाला।
शिवदीक्षा दिधली त्याने। तुज जन्माच्या शुभकाळा।
गुरुकृपा विभूतिबलाने। उठविसी सुप्त जगताला।
सर्वत्र शैवमत पसरे। निंदोनी धर्म न दुसरे।
शिकविसी तूच तत्त्व खरे। राखुनी सत्त्व निर्धारा।। बाळा जो जो।।३।।

गंगांबा मातुलकन्या। गुर्वाज्ञेने त्वां वरिली।
बलदेव मातुलाज्ञेने। तत्प्रधानकी चालविली।

बिज्जलाख्य नृपराज्यीची। अज्ञता पूर्ण घालविली।
तू तशी तुझी ती भार्या। तुज साह्य करी सत्कार्या।
पतिपरायण स्त्री आर्या। रुची भरी खरी संसारा।। बाळा जो जो।।४।।

जनी वनी स्मशानामाजी। स्थापुनी शिवलिंगे भावे।
अशिवास मुळी विसरोनी। शिवरूप विश्व देखावे।
त्या वीरशैवधर्माचे। हे सुधासार सेवावे।
लाभेल अमरता तेणे। देऊनी दिव्यदृक् देणे।
झालास शिवाचे लेणे। पात्र तूच तव अधिकारा।। बाळा जो जो।।५।।

**शब्दार्थ :**

बसव-कुमारा = बसवबाळा. वेदान्ती = वेदान्तशास्त्रात, उपनिषदांत. काळगतीने = काळाच्या प्रभावाने, प्रवाहाने. मृतकळा = अवनत अवस्था, अधोगती. कर्माने = कर्मकांडाने. तम = अंधार. निद्रेचा अंमल = अज्ञानरूपी झोपेचा प्रभाव. जागर = जागृती. हिंगुळीपुरी = बसवेश्वरांच्या जन्मस्थळाचे पौराणिक नाव. कर्नाटी = कर्नाटकात. सुतचिंतादग्ध = मूल नसल्याच्या चिंतारूपी अग्नीत पोळलेली. संगमेश = कूडलसंगमावरील संगमेश्वरदेव. मातुलकन्या = मामाची मुलगी. गुर्वाज्ञा = गुरूची आज्ञा. वरिली = लग्न केले. अज्ञता = अज्ञान. अशिव = अमंगल, शिवाशिवाय अन्य. सुधासार = वीरशैवधर्मरूपी अमृताचे सार, अर्थात् हा पाळणा. दिव्यदृक् देणे = दिव्य दृष्टीची देणगी. लेणे = भूषण, अलंकार.

## ३. अक्कमहादेवीचा पाळणा

**शिवदास** : अक्कमहादेवीचा हा पाळणा कोण्या अज्ञात शिवदासाने रचलेला आहे. या पाळण्यात कवीने सात्त्विककळेची अक्कमहादेवी कलाकलाने कशी वाढते आणि तिचे वैराग्यमूर्तीत कसे रूपांतर होते याचे वर्णन अलंकारिक भाषेत केल्यामुळे पाळणा गोड झाला आहे.

उमामातेची सात्त्विकी कळा। अक्का महादेवी योगिनी बाळा।
लिंगांगज्ञानाची निर्मळ ज्वाळा। जो बाळा जो रे।।१।।

कर्नाटक प्रांती उडूतडी ग्राम। निर्मलशेट्टी पिता शिवभक्ती धाम।
माता सुमती अशी अनुपम। जो बाळा जो रे।।२।।

लावण्यमयी सुंदर बाळा। वाढू लागे जेवी चंद्राची कळा।
चित्ती लागला शिवभक्तीचा लळा।।३।।

कौशिक राजाची दृष्टि वाईट। कानी ऐकोनिया ऐसी ही गोष्ट।
देहभावाचा मानिला वीट। जो बाळा जो रे।।४।।

सोडोनिया माया ममता सकळ। अंतरी वैराग्य झाले सकळ।
निघे लिंगभक्ती धरूनी केवळ।। जो बाळा जो रे।।५।।

लिंगपती हा भाव धरून। अनुभवभक्ती अंतरी पाहून।
आली कल्याणा शोधीत जाण। जो बाळा जो रे।।६।।

बसवण्णाची भक्ती पहाण्यासाठी। अनुभवमंडपी शरणांची दाटी।
तयामध्ये माझी अक्का गोरटी।। जो बाळा जो रे।।७।।

श्रीशैल्यवासी मल्लिकार्जुन। त्याच्या शोधालागी गेली सुजाण।
कदलीवनी तप आरंभी पूर्ण।। जो बाळा जो रे।।८।।

चन्नमल्लय्याची भेटी घेऊन। अक्का महादेवी झालीसे धन्य।
शिवदासाचे करील कल्याण।। जो बाळा जो रे।।९।।

**शब्दार्थ :**

लिंगांग ज्ञान = लिंग (शिव) आणि अंग (जीव) यांच्या एकत्वाचे ज्ञान. उडूतडी = गावाचे नाव, या गावात अक्कमहादेवीचा जन्म झाला. देहभावाचा = स्त्रीदेहाचा. लिंगपती = लिंग हाच आपला पती आहे अशी भावना. कल्याणा = कल्याण नगरात. अनुभवमंटप = कल्याण (आताचे बसवकल्याण) येथे आध्यात्मिक चर्चेसाठी उभारलेला मंडप. सुजाण = ज्ञानी. कदलीवनी- श्रीशैलपर्वतावरील अरण्यात.

## ४. मन्मथस्वामींचा पाळणा

**नीलकंठ** (जन्म ११-९-१९६३) : ष. ब्र. नीलकंठ गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्य (धारेश्वर, जि. सातारा) हे धारेश्वर मठाचे विद्यमान असे तरुण, तडफदार व वीरशैव साहित्याचा ध्यास घेतलेले शिवाचार्य. धर्मप्रचार, परमरहस्यपारायण व धर्मजागरण हेच त्यांचे ध्येय आहे. 'धारेश्वर' हे नियतकालिक गेल्या ११ वर्षापासून ते संपादित/प्रकाशित

करीत असतात. लहानपणापासून काव्याची आवड. पाऊले चालती, भक्तिसुधा, परमरहस्यसारामृत (सार्थ), बृहत् शिवपूजाविधी आदी अनेक पुस्तके संपादित व प्रकाशित केली. त्यांनी अनेक अभंग, पाळणे, पदे, आरत्या रचल्या आहेत. त्यांनी लिहिलेला मन्मथस्वामींचा हा पाळणा चांगला उतरला असून त्यात काव्यगुण भरलेले आहेत.

वसंत पंचमी माघ महिन्यात। शके चौदाशे ब्यांशी सालात।
बाळ जन्मले बालेघाटात। जो बाळा जो रे जो।।१।।

नेकनूर ग्रामी आनंद झाला। शिवलिंगस्वामींना पुत्र लाभला।
वर्णावे किती हर्षानंदाला। जो बाळा जो रे जो।।२।।

दुस-या दिवशी आनंद फार। मामा देती हो जना साखर।
माता पार्वती आनंदे चूर। जो बाळा जो रे जो।।३।।

तिस-या दिवशी बोलती जन। वसंत पंचमीला झाले जनन।
धन्य कार्तिक शंभुनंदन। जो बाळा जो रे जो।।४।।

चवथ्या दिवशी चार प्रकार। बाळाला करी नानालंकार।
वस्त्रादी त्याला देती हो फार। जो बाळा जो रे जो।।५।।

पाचव्या दिवशी वेगळा रंग। बाळराजाला दिधले लिंग।
जरी तो असे सदाशिवसंग। जो बाळा जो रे जो।।६।।

दिवसेंदिवस बाळ वाढतो। डफ घेऊनी दुडदुडतो।
लावण्या, कटाव, पदे म्हणतो। जो बाळा जो रे जो।।७।।

मानूरमठाच्या बसवस्वामींनी। संस्कृत कन्नड भाषा शिकवूनी।
संत बनविले शाहिरी सोडूनी। जो बाळा जो रे जो।।८।।

कराड आणि शिंगणापुरात। शिवभक्तीचा प्रचार करीत।
पंढरपुरातून आले मन्मथ। जो बाळा जो रे जो।।९।।

जळाले जरी अभंग काही। लावण्या कटाव आणि पदेही।
परमरहस्य तैसाचि राही। जो बाळा जो रे जो।।१०।।

पंढरपूरच्या सा-या संतांनी। शिवतत्त्वाची महती ऐकूनी।
दिली उपाधी संतशिरोमणी। जो बाळा जो रे जो।।११।।

बाराव्या दिवशी वेगळा थाट। नाव ठेविले बाळ मन्मथ।
वंदितो तया 'श्रीनीलकंठ'। जो बाळा जो रे जो।।१२।।

**शब्दार्थ :**

बालेघाट = मराठवाड्यातील डोंगररांगा. चूर = निमग्न. शिवलिंग = शिवस्वरूप. लावणी, कटाव, पद = मराठी काव्यरचनेचे प्रकार.

## ५. पाळणा महालिंगाचा

**सदानंद** (अंदाजे इ. स. १८८०-१९४०) : सदानंदबुवांनी लिहिलेल्या या महालिंगाच्या पाळण्यात चार देह, सहस्रदळ आदी उपमांचा वापर करून कवीने महालिंगाचे महानत्व मांडण्याचा प्रयत्न केला आहे. वेदही ज्याच्यापुढे मौनावतात असे हे महालिंगस्वरूप वीरशैवांना मात्र सुलभ व हृदयात साठविता येते, हे या ठिकाणी दाखविले आहे. सदानंदबुवांच्या नादमधुर रचनेचा प्रत्यय या पाळण्यात जाणवतो.

बाळा जो जो रे महालिंगा। भक्ताच्या भवभंगा।
निद्रा करी बाळा शिवलिंगा। असशी तू अभंगा। जो बाळा जो रे जो।।१।।

चारी देहाचा पाळणा। विणूनी पंचप्राणा।
सहस्रदळाचा बिछाना। मध्ये कैलासराणा। जो बाळा जो रे जो।।२।।

दयाक्षमादी, शुद्धमती। शांतीही हालविती।
भक्ती होऊनी पुढती। नामाते ठेविती। जो बाळा जो रे जो।।३।।

एरव्ही अनाम तू पशुपती। कोणा न कळे गती।
ब्रह्माविष्णूही शोधीती। वेद मौनावती। जो बाळा जो रे जो।।४।।

परि वीरशैव भक्ताला। सुलभ असशी झाला।
त्याच्या हृदयात साठवला। सदानंदे गाईला। जो बाळा जो रे जो।।५।।

**शब्दार्थ :**

भवभंगा = संसाराचा भंग म्हणजे नाश करणारा. चारी देह = स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण हे चार देह. पंचप्राण = प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पाच वायू.

सहस्रदळ = मस्तकात सहस्र पाकळ्यांचे कमळ असते, अशी योगशास्त्राची धारणा आहे. नाभिस्थळावरील कुंडलिनी शक्ती सहस्रदलात पोहोचली की योग्याला निर्विकल्प समाधी मिळते. अनाम = ज्याला नाव नाही असा. मौनावती = मुके होतात. सुलभ = सोपा.

## प्रश्नावली

प्रश्न १ : खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्याः–

१. अक्का महादेवीचा पाळणा कोणी लिहिला आहे?

२. सांब कवीचे पूर्ण नाव सांगा.

३. सुमंत कवीचे पूर्ण नाव सांगा.

४. पाळणा केव्हा म्हणतात?

५. पाळणा हे कोणते गीत आहे?

प्रश्न २ : पुढील वाक्यांतील रिकाम्या जागी कंसात दिलेल्यापैकी योग्य शब्द भरून ती पंक्ती पूर्ण कराः–

१. गंगाम्बा ...... । गुर्वाज्ञेने त्वा वरिली (मातुलकन्या / मानसकन्या)

२. त्या वीरशैवधर्माचे। हे ...... सेवावे (कथासार / सुधासार)

३. उमामातेची ...... कळा। अक्कमहादेवी योगिनी बाळा (सात्त्विकी / राजसी)

४. बसवणाची भक्ती पहाण्यासाठी। ...... शरणांची दाटी।।
(सभामंडपी / अनुभवमंडपी)

५. ...... माघ महिन्यात। शके चौदाशे ब्यांशी सालात।।
(ललिता पंचमी / वसंत पंचमी)

प्रश्न ३ : खालील विषयावर प्रत्येकी १० ते १२ वाक्यांत टीपा लिहाः–

१. पाळणा : एक काव्यप्रकार.

२. वीरशैवधर्माचे पाच आचार्य.

प्रश्न ४ : खालील प्रश्नांची प्रत्येकी २० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. बसवेश्वरांना 'शिवाचे लेणे' असे कवी सुमंताने का म्हटले आहे?

२. अक्कमहादेवीच्या जीवनातील वैशिष्ट्ये स्पष्ट करा.

प्रश्न ५ : खालील प्रश्नांची प्रत्येकी ८ ते १० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. मन्मथस्वामींच्या जीवनातील कोणते महत्त्वाचे प्रसंग नीळकंठ कवीने वर्णिले आहेत?

२. सदानंदबुवांनी वर्णिलेली महालिंगाची महानता तुमच्या शब्दांत स्पष्ट करा.



# ३ अष्टक

परमेश्वराला उद्देशून जी प्रार्थना केली जाते त्याला अष्टक म्हणतात. मुळात ते स्तोत्रच असते. पण त्याची कडवी आठ असल्यामुळे त्याला अष्टक म्हणतात. मराठीत शिवगुरुदास, बसवदास, रेवणसिद्ध शिवाचार्य, नीळकंठ शिवाचार्य आदींनी मन्मथस्वामी, बसवेश्वर आदींवर अष्टके लिहिलेली आहेत. आर्त भावनेने परमेश्वराकडे मागणे मागून 'माझा सांभाळ कर, माझ्यावर कृपा कर, माझा उद्धार कर' अशी अष्टकात वारंवार करुणा भाकलेली असते. पूजेच्या वेळी अष्टके सामुदायिकरीत्या म्हटली जातात. संस्कृत अष्टकावरूनच मराठीत अष्टक प्रकार आलेला आहे. संस्कृतमधील 'लिंगाष्टक' प्रसिद्ध आहे. अनाम कवीचे 'कोमलाग्र बिल्वपत्र या शिवास वाहिजे' अशा ध्रुवपदाचे बिल्वाष्टक महाराष्ट्रात सर्वत्र म्हटले जाते.

## १. मन्मथाष्टक

**गुरुपाद / बसवदास** (१७-१-१८८७ ते ८-२-१९२४) : मूळ नाव गुरुपादय्या चन्नबसवणप्पा रेवणशेट्टे (ऊर्फ शेटकार). हे हणेगाव, ता. देगलूर, जि. नांदेड येथील रहिवासी. त्यांनी अनेक अभंग, पदे, ओव्या, अष्टके, स्तोत्रे, आख्याने आदींची रचना केली. अनेक तीर्थस्थळांची यात्रा केली व त्याचे वर्णन रोजनिशीत करून ठेवले. मराठवाड्यातला पहिला बसवजयंती उत्सव हणेगाव येथे सुरू केला. यांनी काही रचनेत 'बसवदास' व काही रचनेत 'गुरुपाद' असा स्वतःचा उल्लेख केला आहे.

गुरुपाद ऊर्फ बसवदास यांची या ठिकाणी निवडलेली दोन अष्टके– मन्मथाष्टक व अष्टावरणाष्टक– रचनेच्या दृष्टीने चांगली आहेत. मन्मथाष्टकात कवीने मी पापी आहे, वारी करीत नाही, कधी कपिलधारला गेलो नाही, असे म्हणून करुणा भाकली आहे. तुझ्यावाचून माझे कोण रक्षण करील? असे म्हणून वारंवार 'मला तारि रे मन्मथा शीवराजा' अशी प्रार्थना केली आहे. 'तुझी माळ कंठी नसे घातलो रे' यामधील 'माळ घातलो' ही लकब वैशिष्ट्यपूर्ण आहे. कन्नड मातृभाषा असणारे लोक मराठी बोलताना 'केलो' (केले), 'घातलो' (घातले) असे शब्दप्रयोग करतात.

अष्टावरणाष्टकात प्रत्येक आवरणावर एक एक श्लोक रचलेला आहे. प्रत्येक आवरणाचे महत्त्व व वैशिष्ट्ये सांगितली आहेत. भुजंगप्रयात या सोप्या वृत्तातली ही रचना ऐकताना कानाला गोड लागते. काही ठिकाणी छंदोभंग झालेला जाणवतो.

(वृत्त : भुजंगप्रयात)

असे पातकी घातकी भक्तिहीन। सदा कामक्रोधामध्ये मी निमग्न।।
कधी नाहि केली तुझी पादपूजा। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।१।।

कधी कार्तिकी पौर्णिमेशी न आलो। कधी नाममंत्रा मुखी वर्णियेलो।।
नसे अर्पिला देह हा स्वामिकाजा। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।२।।

कधी भक्तिने वारि मी नाहि केली। कधी लोचनी मूर्ति ती देखियेली।।
नको दूर पाहू विभो ब्रह्मतेजा। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।३।।

कधी पंचकुंडी नसे स्नान केले। कधी दीनोद्धारा मनी आठवीले।।
चिदानंद तू भाविका कल्पभूजा। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।४।।

तुझी माळ कंठी नसे घातलो रे। तुझे ब्रीद जिव्हे नसे गायिलो रे।
नसे स्कंधि ती वाहिली तूझि ध्वजा। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।५।।

तुझी कीर्ति मी ऐकली नाहि कानी। तुझे स्नेहवी भक्तवृंदा न मानी।।
सखासोयरा तूचि कैवारि माझा। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।६।।

तुझे द्वारिचा श्वान मी झालो बा रे। दयासागरा तू नको मोकलू रे।।
सदा तिष्ठतो दारि हा दास तूझा। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।७।।

बहू कष्टलो जन्ममृत्यू निवारी। भवापासुनी बसवदासासि तारी।।
तुझेवाचुनी रक्षिता कोण दुजा?। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।८।।

पठे नित्य जो भक्तिने अष्टकाते। सुखे पावतो शीघ्र मुक्तीपदाते।।
म्हणूनीच त्याला भजा, नित्य पूजा। मला तारि रे मन्मथा शीवराजा।।९।।

**शब्दार्थ :**

नाममंत्र = मन्मथांचे नाव हाच मंत्र. स्वामिकाजा = श्रीगुरूच्या, ईश्वराच्या कार्यासाठी. वारी = कपिलधारची यात्रा. विभो = व्यापक. ब्रह्मतेजा = अत्यंत तेजस्वी. पंचकुंड = कपिलधार येथील पाच कुंडे. दीनोद्धार = कपिलधार येथे वास्तव्य असलेले, मन्मथस्वामींचे मार्गदर्शक शिवयोगी. यांची समाधी कपिलधार येथे आहे. स्कंदी = खांद्यावर. स्नेहवी भक्तवृंद = स्नेह करणा-या भक्तांचा समूह. मोकलू = ढकलू.

## २. अष्टावरणाष्टक

(वृत्त- भुजंगप्रयात)

गुरूची करी तू अरे नित्य सेवा। गुरूच्या मुखाने शिवमंत्र घ्यावा।।
गुरूवाचुनी मोक्ष कोणास दावा। म्हणूनी सदा हो गुरूराज ध्यावा।।१।।

करी लिंगपूजा अरे तू त्रिकाळी। बरी तीच पुण्य, बहू दोष जाळी।।
जरी लिंगपूजा घडे एकवेळी। तरी मुक्त होशी, नसे मोहजाळी।।२।।

सदा जंगमाच्या पदी लीन होई। तयावाचुनी थोर कोणीच नाही।।
भक्ताप्रति मुक्त करण्यास पाही। फिरे मूर्ति साची जगी देश दाही।।३।।

गुरूतीर्थ पादोदक नित्य घेई। त्वरे सेवुनी तू अगा मुक्त होई।।
नरा, काशि कृष्णा गंगातीर्थ पाही। गुरूरंध्रि बींदूसम जाण पाही।।४।।

गुरू सांब आणि जंगमप्रसादा। करी भोजनी, तू त्यजी काळबाधा।।
प्रसादे महिमा कळे साधुसिद्धा। तसे योगि संतासि सुज्ञानबोधा।।५।।

अरे वीभुती नित्य लावी कपाळी। विभूती विधीच्या लिखीतास जाळी।।
विभूती करीते बहूदोष-होळी। चिताभस्म तो लाविला चंद्रमौळी।।६।।

शिवे जाळिले हो त्रिपूरास जेव्हा। चक्षूतूनि येति जलबिंदु तेव्हा।।
मणी रुद्र-अक्षा शिवे निर्मियेला। गळ्यामाजि नित्य सदोदीत घाला।।७।।

असे श्रेष्ठ मंत्राहुनी मंत्र त्राता। जपा, वारितो हो भया शोकचिंता।।
जरी सोय ऐशी त्यजीतोस आता। कसा पावसी रे तरी मोक्षपंथा?।।८।।

पठे नित्य जो अष्टवर्णाष्टकाते। बहू प्रीय वाटेचि कालांतकाते।।
गुरूपाद तो प्रीतिने अष्टकाते। करी, नित्य अर्पी सदा त्या शिवाते।।९।।

**शब्दार्थ :**

ध्यावा = ध्यान करावे. मोहजाळी = मोहजालात.
पादोदक = श्रीगुरूंच्या पायाचे तीर्थ.
त्यजी कालबाधा = काळाची भीती सोडून दे.
विधीच्या लिखितास = नशिबाला. त्रिपुरास = त्रिपुरासुर राक्षसाला.
त्राता = तारणारा. कालांतकाते = कालाचा अंत करणा-या शिवाला.

## ३. श्रीदेशिकेंद्रस्तवनाष्टक

**श्रीराम** : कै. श्रीराम गुळवणे हे भिंगार (जि. नगर) येथे इंग्रजीचे प्राध्यापक होते. धर्मवीर देशिकेंद्र महाराज, लातूर यांच्या प्रेरणेने वीरशैव वाङ्‌मयलेखनास प्रारंभ. 'सती अक्कमहादेवी' हे नाटक प्रसिद्ध. अनेक लेख ज्ञानप्रसादमधून प्रसिद्ध. त्यांचे उर्दू भाषेवरही प्रभुत्व होते. उर्दू शेरोशायरीचा अनुवादही (इंद्रधनुष्य) प्रसिद्ध केला आहे. त्यांनी लातूर येथे 'देशिकेंद्र बोधाश्रम' ही संस्था स्थापन केली होती. देशिकेंद्र महाराजांचे हे शिष्य होते. ह्यांनी देशिकेंद्र महाराजांवर लिहिलेले हे अष्टक अत्यंत सुंदर आहे. देशिकेंद्र महाराज यांचे पूर्ण नाव विरूपाक्ष देशिकेंद्र महाराज. यांचा काल इ. स. १८८८ ते १९७५. मराठवाड्यातले पहिले वीरशैव लेखक. १९२० ते १९३२ पर्यंत 'शिक्षणप्रकाश' मासिक चालविले. १९३२ मध्ये 'वीरशैव गर्जना' साप्ताहिकाचे संपादक व अनेक पुस्तकांचे लेखक. प्रभावी वक्ते. अनेक सभा-संमेलनांत हिरीरीने सहभाग. कपिलधार देवस्थानच्या उत्कर्षात सिंहाचा वाटा. स्वतःची सर्व संपत्ती दान. त्यांच्या नावाने लातूरला महाराष्ट्रातले प्रसिद्ध 'देशिकेंद्र विद्यालय' १९६३ पासून चालू आहे.

अत्यंत सुंदर अशा शब्दांत गुरूची प्रार्थना यात करून वीरशैवांत ऐक्य कसे नांदेल, समाजोन्नती कशी होईल, लिंगपूजेचा प्रसार कसा होईल,आमचे दोष नाश करून उद्धार कर, सद्‌गुरू तू आमच्या पुढे परिस आहेस, कल्पवृक्ष आहेस म्हणून 'तुझ्या पायि हे शीर्ष शतदा नमावे। मुखी नाम तुझे अखंडित यावे' अशी प्रार्थना करून अष्टक संपविले आहे.

(भुजंगप्रयात वृत्त)

नमो धर्मवीरा नमो देशिकेंद्रा। झडो त्वत्कृपें आमुची मोहनिद्रा।
जडो नित्य चित्तीं तुझी ध्यानमुद्रा। घडो सत्कृती, मार्ग दावी दयार्द्रा।।१।।

बुडालों अम्ही खोल पापार्णवांत। प्रपंचाचिया घातकी कर्दमांत।
अम्हां तारण्या स्वामि तूंची समर्थ। तयाकारणें प्रार्थितों तूज नित्य।।२।।

अहा! मानवी देह पुण्यें मिळाला। परी मोहमाया सतावी जिवाला।
छळी दुष्ट आम्हांसि प्रारब्धलीला। प्रवृत्ती न होई शिवाच्या जपाला।।३।।

प्रभो! तूं अम्हां दाखवी धर्म-रीत। अम्हां मुक्तिचें होउं दे द्वार प्राप्त।
शिवाचे बनाया अम्ही सत्य भक्त। गुरो, मार्ग दावी, करी मोहमुक्त।।४।।

मिळो जातिभेदांसि माती तमाम। घडो वीरशैवान्तरीं सख्य प्रेम।
सदा लिंगपूजा, मुखीं शंभुनाम। शिवाचारिं लाभो अम्हां 'ऐक्यधाम'।।५।।

प्रपंचीं कसें साधणें युक्त कर्म। कसा रक्षिणे वीरशैवें स्वधर्म।
समाजोन्नतीचें अम्हां सांग मर्म। अम्हां उद्धरी नाशुनी दोष-वर्म।।६।।

जसा लोहखंडास लाभे परीस। दरिद्र्यापुढें ठाकला कल्पवृक्ष।
तसा सद्गुरो! तूं अम्हां सेवकांस। करी आपणांसारखे तूं जनांस।।७।।

तुझें ध्यान तें नित्य नेत्रीं दिसावें। तुझे बोल कानीं सदाचे ठसावे।
तुझ्या पायिं हें शीर्ष शतदां नमावें। मुखीं नाम तूझें अखंडीत यावें।।८।।

(अनुष्टुभ् छंद)
श्रीदेशिकेंद्र पादपद्मीं होवोनि नतमस्तक।
श्रीराम भक्तिभावानें अर्पितो स्तवनाष्टक।।

**शब्दार्थ :**

मोहनिद्रा = सांसारिक मोहाची झापड. पापार्णव = पापाचा समुद्र. कर्दम = चिखल. सतावी = संत्रस्त करते. प्रारब्धलीला = नशिबाचे भोग. धर्म-रीत = धर्माचा मार्ग. तमाम = सर्व. ऐक्यधाम = शिवसामरस्य, मोक्ष. लोहखंड = लोखंडाचा तुकडा. शीर्ष = मस्तक. शतदा = शंभर वेळा.

## प्रश्नावली

प्रश्न १ : पुढीलपैकी दोनवर प्रत्येकी १० ते १२ वाक्यांत टीपा लिहाः-

१. अष्टक : एक काव्यरचनाप्रकार. २. बसवदास ऊर्फ गुरुपाद यांचे चरित्र.

प्रश्न २ : खालील प्रश्नांची प्रत्येकी २० वाक्यांत उत्तरे लिहाः-

१. गुरुपाद / बसवदास यांनी 'मला तारि रे मन्मथा शीवराजा' अशी करुणा का भाकली आहे?
२. वीरशैवधर्माची आठ आवरणे कोणती? प्रत्येक आवरणाची महत्त्व सांगा.
३. कवी श्रीराम यांनी त्यांच्या अष्टकातून कोणाला कोणती प्रार्थना केली आहे?

प्रश्न ३ : खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहाः-

१. संस्कृत भाषेतील कोणते अष्टक प्रसिद्ध आहे?
२. भक्तिपूर्वक नित्य अष्टक पठण करणा-याला शीघ्र काय प्राप्त होते?
३. गुरुपाद / बसवदास यांनी आपले अष्टक कोणास अर्पण केले आहे?
४. मानवी जीवाला नेहमी कोण सतावीत असते?



# ४ आरती

कोणत्याही पूजेचा उपचार आरतीशिवाय पूर्ण होत नाही. देवाला आरती ओवाळताना आर्त भावनेने मागणे मागितले जाते ती आरती. मराठीत आरत्या मोठ्या प्रमाणात लिहिल्या गेल्या असून त्या ठराविक चालींवर सामुदायिकरीत्या म्हटल्या जातात. वीरशैवांच्या आरत्या आता  विपुल प्रमाणात उपलब्ध झाल्या आहेत. अंगभूत गेयतेमुळे आरत्यांचा सर्वत्र द्रुतगतीने संचार होतो.

## १. श्रीजगद्गुरू पंचाचार्यांची आरती

**सांब** (इ. स. १८९२–१९२७) : सांबप्पा बापूआप्पा ब्याळे यांची सुप्रसिद्ध रचना असून यात प्रत्येक आचार्याचे वर्णन एकेका कडव्यात केलेले आहे. गेयता आणि नादमधुरता हे या आरतीचे वैशिष्ट्य असल्यामुळे महाराष्ट्रात ती सर्वदूर पोहोचली आहे. सांब यांचे चरित्र अन्यत्र आले आहेच.

मंगलमय महालिंगोद्भव गुरु शिवांग पंचाचार्यांना।
लिंगविभूषित भंगभवाब्धी मंगल आरती करू त्यांना।।धृ.।।

जन्ममरणभय हरण करोनि पावन करिसी भक्तांना।
तन मन भावे अर्पण करितो सिद्ध रेणुकाचार्यांना।।१।।

थोर घोर भव दूर कराया सुरवर भाकिती तव करुणा।
वीरशैवमतवारिधिशशिधर स्मरा दारुकाचार्यांना।।२।।

लोकदयाळा सर्वव्यापका अससी बोधक सकलांना।
शोकनाशका भाकितो करुणा एकोरामाराध्यांना।।३।।

चंडमताशी खंडन करूनि बोधिशी ब्रह्माखंडाना।
पिंडिब्रह्मांडी गुरू व्यापका नमितो पंडिताराध्यांना।।४।।

विश्वेश्वर लिंगोद्भव होशी विश्वपालका दयाघना।
ईश्वरभक्तीसी शाश्वत करी त्या स्मरितो विश्वाराध्यांना।।५।।

अज्ञ बांधवा सुबोध कराया नमितो पंचाचार्यांना।
वीरगोत्रोद्भव सांब विनवितो कृपा करावी या दीना।।६।।

**शब्दार्थ :**

लिंगोद्भव = लिंगातून उत्पन्न झालेले (पंचाचार्य). शिवांग = शिवाचे अंश असलेले, शिवगण. लिंगविभूषित = इष्टलिंगांनी अलंकृत झालेले. भंगभवाब्धी = भवाब्धी म्हणजे संसारसागर, त्याचा भंग करणारा. वीरशैवमतवारिधिशशिधर = वीरशैवधर्मरूपी सागराला भरती आणणा-या चंद्राला धारण करणारा. शोकनाशका = दुःख नाहीसे करणारा. चंडमत = नास्तिक मत. विश्वपालका = विश्वाचे पालन करणारा. नमामि = नमस्कार करतो. अज्ञ = अज्ञानी. वीरगोत्रोद्भव = वीरगोत्रातील. वीर, नंदी, भृंगी, वृषभ व स्कंद अशी पंचाचार्यांची पाच गोत्रे आहेत. वीरशैव यांपैकी कोणत्या तरी एका गोत्राचा असतो. कवी वीरगोत्राचा आहे.

## २. श्रीमन्मथस्वामींची आरती

**शिवदास** : हे मन्मथस्वामींचे समकालीन शिष्य होते. यांनी मन्मथस्वामींची लिहिलेली आरती प्रसिद्ध आहे. तसेच भारुडे, ताकीदपत्रेही लिहिली आहेत. शिवदास नावाचे अनेक कवी होऊन गेले. अभंगकार शिवदास नेमके कोण, याबद्दल संशोधकात मतभेद आहेत. महाराष्ट्रातले सुप्रसिद्ध संत मन्मथस्वामी यांची आरती गाणारे शिवदास बीडकर 'शिवदास' म्हणून ओळखले जातात. यांचे चरित्र-कार्य-साहित्य उपलब्ध नाही. शिवदास नावाचे अनेक कवी असल्यामुळे विद्वानांत मतभेद आहेत.

मन्मथस्वामींचे चित्र डोळ्यापुढे उभे करणारी ही आरती मोजक्या शब्दांत मन्मथस्वामींबद्दलच्या भावना व्यक्त करते. कपिलधारचे स्थलमाहात्म्य, मन्मथस्वामींचे शिवभक्तिप्रचाराचे कार्य, अभंगांचे निरूपण, परमरहस्य-लेखन आदींचा स्पष्ट उल्लेख करून मन्मथमाऊलीचे चित्र कवीने आपल्यासमोर ठेवले आहे.

आरती शिवराजा। मन्मथस्वामी महाराजा।
वेदान्ताचे सार, मुख्य पेरिले बीज।।धृ.।।

समाधि महास्थळी, सर्पव्याघ्रांची जाळी।
निर्वेर श्वापदे हो, समदृष्टीने न्याहाळी।।१।।

शिवभक्ति लोप झाली, विश्व शिवमय केले।
ग्रंथ हा परमरहस्य, गुह्य प्रकट केले।।२।।

अभंगी निरूपण, अनुभविले ज्ञान।
आनंद शिवदासा, सर्व शुभकल्याण।।३।।

## ३. आरती नागेशाची

**मन्मथस्वामी** : परमरहस्य ग्रंथाचे कर्ते, वीरशैवाचे पहिले पदकार, कीर्तनकार मन्मथस्वामींनी अनेक स्फुट रचना केल्या आहेत. त्यांच्या २-३ आरत्या उपलब्ध आहेत. त्यांपैकी एक त्यांचे गुरू नागेशस्वामी यांच्यावरील आरती येथे घेतली आहे. अत्यंत साध्या सोप्या शब्दांत आपल्या भावना कवीने शब्दबद्ध केल्या आहेत. मुद्रिकेत 'मन्मथ शिवलिंग म्हणे मी नागेशाचा, मी भुजंगाचा' असा नागनाथांचा उल्लेख केला आहे. ही आरती मौखिक परंपरेतून उपलब्ध झाल्यामुळे तिच्यात शैथिल्य आढळते. ही आरती नागेशसंप्रदायात, वडवाळ नागनाथ (ता. मोहोळ, जि. सोलापूर) येथे नेहमी म्हटली जाते.

जयदेव जय नागनाथा। गुरु नागनाथा
आरती ओवाळू। भावारती ओवाळू चरणावर माथा।।धृ.।।

अनंत ब्रह्मांड तू व्यापक जाणा।
म्हणुनिया शरण तुमचिया चरणा।।१।।

तनमनधन अर्पण। देवा अर्पण।
सद्भावे आरती। भावार्थे आरती चुकवी जन्ममरण।।२।।

मन्मथ शिवलिंग म्हणे मी नागेशाचा। मी भुजंगाचा।
अज्ञान काय नेणो मी शंभोदेवाचा।।३।।

**शब्दार्थ :**

भावारती = भावरूपी आरती.

## ४. आरती वीरभद्राची

**लक्ष्मण** (इ. स. १८०८ ते १८७८) : लक्ष्मण महाराज रऊळगावकर यांचे चरित्र पूर्वी आले आहेच.

वीरभद्र हा वीरशैवांचा मूळ गोत्रपुरुष व अनेक कुटुंबाचे आराध्यदैवत. त्यांची लक्ष्मण महाराजांनी लिहिलेली ही आरती वीरभद्राच्या कर्तृत्वाचा गौरव करणारी आहे. वीरभद्र हा कट्टर शिवभक्त असून त्याला शिवनिंदा अजिबात सहन होत नाही. तो श्रेष्ठ असा गणाचारसंपन्न शिवपुत्र आहे याचे वर्णन या आरतीत आलेले आहे.

आरती वीरभद्रा। शिवप्रिया महारुद्रा। आरती वीरभद्रा।।धृ.।।
प्रतापी तू रुद्र थोर। काळाप्रती दंडणार।
दुष्टांचे रे संहार। करिसी, भक्ताचे माहेर।।आरती.।।१।।
दक्षे शिवनिंदा केली। त्यासी शिक्षा त्वा लाविली।
तोषविला चंद्रमौळी। श्रेष्ठ ताता तू रे बळी।।आरती.।।२।।
दक्षमख विध्वंसून। देव केले अति दीन।
भक्तांचा तू सखा पूर्ण। भक्ता रक्षिसी धावून।।आरती.।।३।।
ब्रह्मांड हे उचलून। नेशी प्रतापी तू पूर्ण।
शिवभक्त दयाघन। आहेसी तू शिवनंदन।।आरती.।।४।।
शिवापाशी निरंतर। वससी रे निर्घोर।
लक्ष्मण हा किंकर। तुमचा म्हणवितो पामर।।आरती.।।५।।

**शब्दार्थ :**

शिवप्रिया = शिवाला प्रिय असलेला. दक्षमख = दक्षाने केलेला यज्ञ. दक्षाच्या यज्ञाचा वीरभद्राने विध्वंस केला, अशी कथा आहे.

## ५. आरती इष्टलिंगाची

**लक्ष्मण** (इ. स. १८०८ ते १८७८) : लक्ष्मण महाराज रऊळगावकर यांचे चरित्र पूर्वी आले आहेच.

इष्टलिंग हे वीरशैवांचे आराध्य दैवत. त्या इष्टलिंगाची आरती लक्ष्मणमहाराजांनी मोजक्या शब्दांत मांडून इष्टलिंगाचे महत्त्व प्रतिपादन केले आहे. इष्टलिंग हे श्रेष्ठ आहे, ते षट्‌चक्रांपलीकडचे आहे, ती आत्मवस्तू आहे, आत्मरूप आहे, म्हणून आत्मसुख देणारी आहे. चार वाचेच्या पलीकडचे इष्टलिंग असून ते मन व बुद्धी यांना अगोचर आहे. असे श्रेष्ठ इष्टलिंग वीरशैव सदैव अंगावर बाळगतात. म्हणून लक्ष्मण महाराजांनी आरतीतून ही भावना व्यक्त केली आहे.

आरती इष्टलिंगा। श्रेष्ठ प्राज्ञा रे सुसंगा।।धृ.।।
अहं ध्वनिपर तू रे। सदासर्वदा सम रे।
शुद्ध बुद्ध नित्य बा रे। भक्ताचे तू जीवन रे।।१।।

चक्रदळातीत तू रे। महालिंग तू सत्य रे।
आचारलिंग गुरू शिवलिंग रे। जंगम प्रसादलिंग ते रे।।२।।

सर्वांचे तू मूळ बा रे। निजवस्तु अलक्ष रे।
वेदान्ताचे गुज तू रे। केवळ निजसिद्धान्त रे।।३।।

मन बुद्धी अगोचर। चहू वाचेचिया पर।
वस्तु ते निर्विकार। सकल देवांचे माहेर।।४।।

कोटी सूर्य भानुदीप्ती। तुझे स्वरूपी लोपती।
वेद सिद्ध तुज ध्याती। लक्ष्मणा देई गती।।५।।

**शब्दार्थ :**

इष्टलिंग = श्रीगुरूंनी शिष्याच्या हातावर संस्कारपूर्वक दिलेले लिंग. चक्रदळातीत = शरीरात षट्चक्रे असून त्यांची दले (पाकळ्या) असतात असे योगशास्त्र मानते. त्या चक्रांपलीकडले इष्टलिंग असते. महालिंग = सर्व श्रेष्ठ असा शिव. निजवस्तू = आत्मवस्तू, आत्मरूप. गुज = गुह्य, सार. चहू वाचा = परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी ह्या चार वाचा. वेद सिद्ध = वेद आणि सिद्धपुरुष. गती = मुक्ती, मोक्ष, सद्गती.

## प्रश्नावली

प्रश्न १ : खालील विषयावर १० ते १२ वाक्यांत टीपा लिहाः–

१. श्रीजगद्गुरू पंचाचार्यांची आरती.

२. श्रीमन्मथस्वामींची आरती.

प्रश्न २ : खालील प्रश्नांची एका वाक्यात उत्तरे लिहाः–

१. कोणत्या काव्यगुणामुळे आरत्यांचा शीघ्रगतीने सर्वत्र संचार होतो?

२. आरत्या ठराविक चालीत कोणत्या रीतीने म्हटल्या जातात?

३. देवाला आरती ओवाळताना कोणत्या भावनेने मागणे मागितले जाते?

४. कशाशिवाय पूजेचा उपचार पूर्ण होऊ शकत नाही?

प्रश्न ३ : खालील प्रश्नांची ८ ते १० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. शिवदासांच्या आरतीच्या आधारे मन्मथस्वामींचे शब्दचित्र रेखाटा.

२. मन्मथस्वामींचे गुरू कोण? त्यांनी आपल्या गुरूची महिमा कशी वर्णिली आहे?

३. वीरभद्रांच्या कोणत्या गुणांमुळे लक्ष्मणांनी त्यांची आरती लिहिली आहे?

४. इष्टलिंगाची आरती कोणी रचली आहे? त्या आरतीतून कवीने वर्णिलेले इष्टलिंगाचे माहात्म्य स्पष्ट करा.

❒❒

# ५ पोवाडा

## १. वीरांगना कित्तुर चन्नम्माचा पोवाडा

**सिद्राम** (जन्म ५-१-१९०८, मृत्यू ३१-१२-१९४५) : शाहीर सिद्राम बसप्पा मुचाटे हे धुळे येथील रहिवासी. यांचे शिक्षण ७ वी पर्यंत झाले होते. सतत २० वर्षे शाहिरी पेशात घालविली. यांचे ३२ पोवाडे उपलब्ध आहेत. १९३०/३२/१९४२ च्या काँग्रेस चळवळीत अनुक्रमे ३ वेळा सहा सहा महिने शिक्षा भोगली. शाहिरांची काव्यरचना सरळ, साध्या शब्दांची, रसभरित आहे. सुंदर चाली, म्हणण्याची ढब, निष्णात डफवादन, मधुर आवाज आणि देशसेवेच्या तळमळीने पूर्ण रंगलेले तन, मन, धन त्यांच्या पोवाड्यातून प्रतीत होते. त्यांच्या पोवाड्याच्या रेकॉर्डस् निघाल्या होत्या.

कित्तुर चन्नम्मा राणीच्या शौर्याचे अत्यंत ओजस्वी शब्दांत प्रत्ययकारी चित्र या पोवाड्यात कवीने रेखाटले आहे. झाशीच्या राणीच्या आधीचा हा समरप्रसंग आहे, हे विशेष.

धन्य धन्य राणी चन्नम्मा। बनविला जिनं रणांगणीं गो-यांचा खिम्मा।।जी।।धृ.।।

कर्नाटकांत जिल्हा बेळगांव। सकल जनां ठावं। त्यांत एक गांव। जयाचं नांव असें कित्तुर। तेथें वीरशैव राजा एक शूर। नामें 'मलसर्ज' समरबहादूर।।जी।। राजास दोन कामिनी। चतुर सद्‌गुणी। शौर्यशालिनी। रुद्रम्मा आणि चन्नम्मा शूर। परंतु पोटीं पुत्र-पौतूर। एक शिवलिंग रुद्रचि थोर।।जी।। (चाल) अठराशें सोळा सालांत। मलसर्ज पातला अंत।। पश्चात् गादीवर येत। शिवलिंगरुद्र तत्पुत्र।। पर कित्तूरच्या राज्याचें। न्यारेच होतें विधिलिखित।। शिवलिंगरुद्रहि गेला। अठराशें चोविसांत।। (लटक) तंवा गादी चालविण्यातला। दत्तक घेणें भाग आला। म्हून जवळच्याच एकाला। सर्वांनी पसंत केला। पर दरबाराचे जंगमाला। ओक्लंदच्या पीठाधिका-याला। हा बेत नाही आवडला। त्यामुळं तंटा वाढला। गेली वर्दी धारवाडला। धारवाडहून कलेक्टर आला। त्यानं संस्थान खालसा केल्याचा हुकूम फर्माविला।।जी।। यापरी संधी साधून। कलेक्टरानं कावा लढवून। घेतलं संस्थान आपल्या ताब्यांत। करूनिया नाकेबंदी गावांत। खजिन्यावरं पहारा ठेविला सक्त।।जी।। रुद्रम्मा आणि चन्नम्माला। निरोप पाठविला। 'येऊन धारवाडला। भेटावं दोघींनींहि आह्मांस। ऐकून तुमचा सर्व इतिहास। देऊं मग न्याय आम्ही तुह्मांस'।।जी।। (चाल) पहा पहा कसा हा छान। लढविला कावा गो-यानं।।

शिका गळेकापूंचे धंदे। शहाजोग यांचेपासून।। मर्कट देतसे न्याय। लोण्याचा गोळा पचवून।। परि लुडबुड ही पाहून। चन्नम्मा गेली खवळून।। (लटक्) तिनं उलट निरोप धाडिला। कलेक्टर थॅकरे साहेबाला। 'येऊन आमचे .देशाला। देणारे न्याय आह्माला। तुह्मी कोण चोर तें बोला?। गृहकलह कितिहि जरी झाला। आह्मी आमचं बघून घेऊं त्याला। नको चिंता त्याची तुह्माला। तुमची न्यायनीति ठाऊक असे आह्माला'।।जी।। खरमरीत जाब हा असा। देऊन खासा। कलेक्टराचा। हेतू ओळखून राणीनं खास। हुकूम सोडिला सकल सैन्यास। 'गडावरी सज्ज राहण्या युद्धास'।।जी।।१।।

मिळतांच जाब धारवाडीं। कलेक्टर सोडीं। हुकूम तद्‌घडीं। ब्लॅक सीवेल सर्व लोकांस। 'डागो तोफखाना कित्तुर किल्ल्यास'। पहा हा मर्दांचा इतिहास।।जी।। सप्टेंबर तेवीस तारखेला। वेढा मग पडला। कित्तुर नगराला। कळला वृत्तांत खेड्यापाड्यांत। जमती हजारो लोक गावांत। पेटे बंडाचा वणवा मग त्यांत।।जी।। (चाल) चन्नम्मा राणी रणशूर। घेऊन करीं समशेर।। अश्वावरी होऊन स्वार। रणीं तुटे अरींचें वर।। रंगलें गौर रक्तानें। मग सकल गांव कित्तुर।। (चाल) धड्ड्ड्ड्ड्ड् करिती तोफा देतां सरबत्ती। देहाच्या चिंध्या चिंध्या होती।। खण्खण् छन् छन् तलवारीचे आवाज ते झडती। आदळतां क्षणीं ढालींवरती।। बंदुकीच्या उडतां फैरी ठण्ण्ण्ण्ण् करिती। आवाजें कानठळ्या बसती।। शिरकमलांचे चेंडू जैसे अस्मानीं उडती। तयांतुनि रक्तबिंदू पडती।। शेष राहिल्या धडांमधुनियां रणभूमिवरती। रक्ताचीं कारंजी उडती।। (मोड) घोड्यांवरी शीरहीन प्रेतें। प्रेतांवरि घोडे पडती।। रुधिराचा चढुनि रंग। जणूं गुलाल बनली माती।। तो गुलाल लेण्यासाठीं। अवतरे चन्नम्मा सती। वाघिणीच्या झडपेनें जणूं तुटे अरींवरती। अरी मग त्राहि त्राहि करिती।। (लटक्)।। यापरि युद्ध घनघोर। चालले पूर्ण तीनवार। बेळगांवचं दुआब लष्कर। जाहलं सर्व रणीं ठार। तवा थॅकरे साहेब बहादुर। धावला आघाडीवर। किल्ल्यांचीं फोडण्या द्वारं। तें वेळीं किल्ल्याचे वर। बाईचा वीर सरदार। बाळप्पा होता रणशूर। त्यानं येतां सरशी समोर। बंदुकीची झाडुनी फैर। उडविल्या थॅकरेच्या ठिक-या ठिक-या चौफेर।।जी।। होतांच कलेक्टर ठार। किल्ल्याचे म्होरं। आँग्ल लष्कर। सोडी चौखूर घोडी जोरांत। भरुनिया धडकी अति उरांत। पळती घेऊन जीव शरिरात।।जी।।२।।

वावटळ उडविते धूळ। तशीच केवळ। उडवी धावपळ। राणी चन्नम्मा गो-यांची खास। दे माय धरणी ठाय हो त्यांस। चिरून काढिलं रणीं कितिकांस।।जी।।

दारुण प्रसंग ओळखून। एजंट स्टीव्हन्सन। इलियट जाण। दडती जाऊन रानावनांत। लुगडीं नेसून बसती गवतांत। जाणा हा सत्य सत्य वृत्तांत।।जी।। (चाल) यापरी एक अबलेनं। मर्दांवरी केली ताण।। त्या कर्नाटक ललनेनं। इंग्रजां केलं हैराण।। हिंदवी नंगी समशेर। नाहली आँग्ल रक्तानं।। (लटक्) धारवाडीं वार्ता ही गेली। कमिशनरची गाळण उडाली। मग पत्र त्यानं खरडिली। चहुंकडून कुमक बोलविली। वीस हजार फौज जमविली। डिंकन्च्या हाताखाली दिली। कलेक्टर थॅकरेच्या स्थळीं। मन्रोची नेमणूक केली। अन् चढविला हल्ला चॅपलीन्नं, कित्तुरावरी।।जी।। साम्राज्यतृष्णा आघोर। इंग्रजी थोर। थॅकरे कलेक्टर। होतांचि रणांगणावरि ठार। पेटला युद्धवणवा अनिवार। ऐका मग पुढील सर्व प्रकार।।जी।। चन्नम्मा किल्ल्यावरून। शत्रू हेरून। तोफा डागवून। सोडिते गोळे इंग्रजांवर। दहा हजार गोरं लष्कर। एका दिवसांत जाहलं ठार।।जी।। (चाल) जुंपली संगरीं झुंज। यापरी पुन्हां मग आज।। रणरागिण चन्नम्मासी। जयश्रीचें चढलें तेज।। रणनभी आँग्ल मेघांत। कडकडे जणूं ती वीज।। (लटक्) करूनियां मारा किल्ल्याला। चॅपलीन जेर जाहला। कोठूनहि डागा तोफेला। आदळून बुरुजावरी गोळा। अंगावर उलटू लागला। असा खुबीदार बांधलेला। होता तो कित्तुरी किल्ला। चौतीस बुरुज किल्ल्याला। भंवताली खंदक भला। तीन पुरुष पाणी खंदकाला। साहेब वेडापिसा झाला। सुरुंग लावून थकून गेला। किल्ल्याचा खडाहि हालेना, त्याच्या बापाला।।जी।। हाय्! हाय! घात परि झाला। तंटा लावलेला जंगम तें वेळां। भेटला येऊन चॅपलीनास। कामण्णन् मड्डी टेकडी त्यानं खास। दावली मा-याची जागा साहेबास।।जी।। कळतांच जागा साहेबाला। मारा त्यानं केला। नेमका त्या स्थळां। तटाला पडे मोठं खिंडार। सुरूं जाहला लोकसंहार। हाय्! मग झाली बाई बेजार।।जी।।३।।

ही नीच फितुरांची जात। जोंवरी जगतांत। असे जीवंत। तोंवरि नसे शौर्याला वाव। अनुभवसिद्ध जाणा हा ठावा। शिवाजीनं मारला मोरे चंद्रराव।।जी।। त्याचपरी चन्नम्माहि जाण। आधींच जाऊन। घालून कंठस्नान। करती जर ठार फितूराला। तर आज पुन्हां ऐन वेळां। नसता बाईचा घात झाला।।जी।। (चाल) कारण कीं त्याच नीचानं। फितुरीचा कळस करून।। पाण्याचे हौदामाजीं। मिसळलें वीष नेऊन।। त्यामुळं पाणी बाधून। पटपटा मरे किती सैन्य।। (लटक्) तैसेंच गांवामधून। किल्ल्यात येणारें अन्न। परस्पर सर्व लुटून। गो-यांनी केलं हैराण। धान्याचा नूरला कण। उपवासी पोटीं लढून। सारं सैन्य गेलं थकून। तंवा

जाणें एक शरण। किंवा तें अर्पणें प्राण। यावीण मार्ग उरला न। मग झाले जीवावरि उदार सर्व लोक जाण।।जी।। परि मरतां मरतांहि जाण। मरावें मारून। विचार असा करून। सजविला घोडा चन्नम्मानं। संग्गोळी बुरुजावरती जाण। निघाली रणीं जाया वाघीण।।जी।। परि बाहेर जाण्याअगोदर। चन्नम्मा नार। किल्ल्याचे वर। जमवुनिं वदे सकल लोकांस। 'वीर हो धनी आतां किल्ल्यास। सर्व तुम्हीच राखा ब्रीदास।।जी।। जाऊन गडाबाहेर। वाचले मी जर। ठीकचि म्होरं। नाहींतर भेट तुम्हां सर्वांस। मर्दहो हीच आतां मम खास'। दाटला कंठीं बाईचें श्वास।।जी।। (चाल) कंठ दाटुनी बोले राणी, गहिंवरुनि मग जनां। 'बंधूनों जाते आतां मी रणा।। माझ्यामागें भीस्त सारी ती तुमच्यावरती गणा। जपा नीट किल्ल्याचें रक्षणां।। किल्ल्यामाजीं तरण्याताठ्या तुमच्या लेकी सूना। गवसतील शत्रूचें हातीं ना। (मोड) तर विटंबना पावोनि। होतील भ्रष्ट कामिनी।। पाशवी वृत्तीचे लोक। करतील अब्रूची हानी।। ही नीच राक्षसी जात। ओळखी न आयाबहिणी।। (चाल) अब्रू गमवूनि प्राण वांचवुनि। जगाल जर या जनीं। षंढ नच तुमच्याहुन मग कुणी।। लढतां लढतां मरा परंतु स्वातंत्र्या गमवुनि। जगुं नका पारतंत्र्यकर्दमीं।। सौभाग्याचा टिळा पुसूं नका मायभूमिचा कुणी। बनूं नका रौरव नरका धनी।।(मोड) जातीचे तुह्मीं सिंह। डरकाळ्या फोडून समरीं।। शत्रूचें नरडीचा घोट घेण्यात तुमची बहादुरी।। दुष्टांतें देऊनि दंड। नांदवा शांति जगभरी'।। (लटक्) यापरी वदुन सर्वांला। मारिली टाच घोड्याला। जीवाची सोडून तूला। सोडिला अश्व ते वेळां। अडविण्या जो जो तिज आला। त्याचा त्याचा खिम्मा बनविला। एक हजार गोरा तें वेळां। एका दमांत कापून काढिला। चमकली समर अंबरीं जणूं ती चपला।।जी।। शत्रूचा उडविते फडशा। उतरवी नक्षा। करी न मग रक्षा। येशूख्रिस्तहि तयांची खास। पडे दहशत सकल गो-यांस। दडती जाऊन द-याखो-यांत।।जी।।४।।

फोडून शत्रूची फळी। तोडोनिया नळी। घायाळ झालेली। वाघीण चन्नम्मा तें वेळीं। संगोळीकडं धांवत सुटली। काया रक्तानं लिडबिडली।।जी।। (चाल) परि जातां जातांहि जाण। निजवीत कितीक कॅप्टन।। इलियट होत दफ्फन। स्टिव्हन्सन्चा खिम्मा करी छान।। सोलापूरच्या मन्रो साहेबासी। काढिला उभा चिरून।। (लटक्) पर दैव बाईचं खोटं। आयुष्यच संपलं होतं। जात असतां संगोळीप्रत। मलप्रभा नदी वाटेंत। दूथडी भरून वाहात। चढलासे पूर जोरांत। पाठीशी शत्रुचा लोट। सिंहीण झाली हतबुद्ध। मग विचार केला मनांत। गवसून शत्रुचें हात।

पारतंत्री श्वानापरी इथं। जगण्यांत का तरी अर्थ?। मग मरण काय वाईट?। असा विचार करून शेवट। टाकिली उडी बाईनं मलप्रभेंत।।जी।। यापरी युद्धाचा होत। दारुण शेवट। कित्तूर किल्ल्यांत। फडकलं निशाण इंग्रजांचं। शूरवीर रणधीर(?) गो-यांचं। बायकांशीं झुंज खेळणारांचं।।जी।। चढतांच निशाण किल्ल्याला। गोरा शेर झाला। गर्वानं फुगला। धरून मग लहानथोरां सकलां। तोफेच्या तोंडीं देत सुटला। जणूं मस्तकीं शूळ उठला।।जी।। (चाल) चन्नम्मा राणीची सून। इरव्वाबाई अज्ञान।। गवसतां गो-यांचें हातीं। तिजलाहि कैद करून।। लष्करी बंदोबस्तांत। धारवाडी जाती घेऊन।। बाईच्या मेण्याभोंवत्ती। संगिनी पहारा चहुंकडून।। (लटक्) ती बारा वर्षांची पोर। बालविधवा नार निराधार। पुष्पाची कळी सुकुमार। पाहून सर्व प्रकार। परिणाम झाला तिजवर। पति सासू सारे गेल्यावर। मीच जगून काय करणार?।। शत्रुंचें कैदेंतच म्होरं। पारतंत्र्य नर्क भोगणार। त्यापरीस मरण फार बरं। असा विचार करुनिया थोर। आंगठींतील काढून हिरकणी, चावली सत्वर।।जी।। चन्नम्माची सवतहि शूर। रुद्रम्मा थोर। नेगीनहाळीं म्होरं। मलप्रभेंतच अर्पि निजप्राण। झाला शेवट यापरी जाण। गातो सिद्राम कवि गुणगान।।जी।। ५।।

## २. सोलापूरचा रणसिंह नरवीर मल्लप्पा धनशेट्टीचा पोवाडा

**सिद्राम** (जन्म ५-१-१९०८, मृत्यू ३१-१२-१९४५) : शाहीर सिद्राम बसप्पा मुचाटे.

सोलापूरला चार हुतात्मे झाले. शंकर सारडा, मल्लप्पा धनशेट्टी, जगन्नाथ शिंदे आणि कुर्बान हुसेन. या चौघांना इंग्रजांनी १२ जानेवारी १९३१ रोजी फासावर लटकावले. चार हुतात्म्यांपैकी मल्लप्पा धनशेट्टी (१८९५-१९३१) हे वीरशैव होते. त्यांच्या जीवनकार्यावर शाहीर सिद्राम यांनी हा पोवाडा लिहिला आहे. योगायोग असा की त्याचवेळी शाहीरदेखील येरवडा तुरुंगात होते. तसा उल्लेख पोवाड्याच्या शेवटी आलेला आहे.

८ मे १९३० रोजी सोलापूरला कायदेभंगाची चळवळ सुरू झाली. बंदीहुकुम मोडून, लोकांनी जंगलात जाऊन शिंदीची झाडे तोडली. त्यावेळी सोलापूरच्या कलेक्टराने गोळीबाराचा हुकुम दिला. लोकांनी कलेक्टराची गाडी अडवली. त्यावेळी माणुसकीच्या नात्याने मल्लप्पा धनशेट्टी यांनी काठी फिरवून लोकांना दूर सारले व कलेक्टरचे प्राण वाचवले. परंतु गोळीबार झाल्यामुळे लोक खवळले होते. ते पोलीसचौकीवर चालून गेले आणि त्यांनी चौकी जाळून टाकली. त्या आगीत दोन पोलीस जळून मेले. त्यानंतर इंग्रजांनी सोलापुरात मार्शल लॉ (लष्करी कायदा) जाहीर केला. गोळीबार झाला, लोकांची धरपकड झाली. त्यावेळी चार हुतात्म्यांना पकडण्यात आले. त्यांच्यावर खटला चालवून

नंतर त्यांना फाशी देण्यात आले.

कवीने प्रस्तुत पोवाड्यात मल्लप्पांचे बालपण, त्यांचे कुस्तीवेड यांचे ओजस्वी भाषेत वर्णन केले आहे. तुरुंगात आईवडील भेटीला आल्यावर मल्लप्पा आईची समजूत घालतात, तो करुण प्रसंग डोळ्यांत अश्रू उभे करतो. साहेबांची मराठी भाषा- टुमचा अर्ज इठं पहुचला, इत्यादी– मजेशीर वाटते. इंग्रजांच्या कावेबाजपणाचे वर्णनही मोठे उपरोधिक आहे. हुतात्मे हे जात्यतीत असतात, परंतु एका वीरशैव हुतात्म्याचा हा पोवाडा वाचताना अभिमान वाटतो आणि स्फुरणही चढते.

धनशेट्टी कुलाचा दिवा, विझवी काजवा, सिंहाचा छावा, सोलापूरवासी। रणधीर वीर मल्लप्पा खरा निर्दोषी। सैतानि सत्तेच्या नीच बलाने ज्यासी। हरहर ! मारिलें ठार देऊनियां फांसी। भारता झोंप घेशी ?।।धृ.।।

एकोणीसशें एकतीस सालांत, हिंदुस्थानांत, धर्मयुद्धात हरपले हिरे मोहरे चार। हिंददेविचे सिंह गुलजार। हाय! दैत्यांनि मारिले ठार।। एक सिंह त्यांत अति महान्, मोठा बलवान, धैर्याची खाण। मौल्यवान हिरा खरा रणधीर। नांव मल्लप्पा ज्याचं जाहीर। गातो पोवाडा त्याचा शाहीर।। (चाल १) ते धन्य धन्य धनशेट्टी वीराचे कुळ।। त्यामधी मल्लप्पा वानि जन्मती बाळ। छे ! बाळ नव्हे तो सिंह जणूं विक्राळ।(लटक्) अठराशे पंच्याणव सालां। नरवीर आला जन्मला। बालपणी बालवीराला। आखाड्याचा नाद लागला। कुस्तीचा शोक जडलेला। रणमल्ल असा चमकला। काय सांगू शरीरयष्टीला!। काळही होईल घाबरा बघुनियां तिला।। (चाल २) सोलापुरी हिरा तो ऐसा। काळानं पळवुनि नेला।। पाशवी सत्तेचा जोर। ह्मणुनियां घात हा झाला।। सर्पाची जहरी जात। चावेल पाळणाराला।। उपकारावरि अपकार। ही म्हण विदीत जगताला।। (लटक्) ह्या आँग्ल कपटी नीतीनं। बाळाचा घेतला प्राण। काय सांगूं वीराचें गुण!। सोलापुरचा दंगा अति महान्। ज्यामधीं नसतां कारण। मेले कैक हिंदुमुसलमान। ज्यामधींही दाविलं होतं शौर्य वीरानं।। दारुण प्रसंग तो तेव्हांचा आठवुन।। अद्यापिही लट्पट्ताति अरिंची मनं।। स्वातंत्र्यदेविचा कंठमणी तो जाण।। जरि मणी असा तेजाळ, होता तो बाळ, तरि त्या जवळ; होतं सर्पाचं बीळही खास। ससाण्याजवळ जणुं तो चास।। होता पूर्वीचा जाण इतिहास।। इतिहास असा हा जाण, त्यांत एक न्यून, तलाव प्रकरण; जेथें वीरानं देवुनिया मान। आँग्ल सत्तेस केलं हैराण। ऐका मर्दाचे गातो गुणगान।।१।।

सोलापुरी एक अति छान, रम्य देवस्थान, बहुत पुरातन, वीरशैवांच्या हक्काचं

खास। 'सिद्धेश्वर' नांव ठावं सकलांस। 'सिद्धेश्वर तलाव' त्याचे लगतास।। धर्माचं न्यायमंदिर, असं ते थोर, परि त्यावर। विषारी सर्प सोडी फुत्कार। दावी अंग्रेज आपला अधिकार। तलाव बुझविण्या झाला तैय्यार।। (चाल) पहा पहा कसें हें आँग्लराज्यधोरण।। शिका गळेकापुंचे धंदे ह्यांच्यापासुन।। हा धर्मन्यायनीतीचा खून पाहुन।। पिडलेली प्रजा गेली एकाएकी खवळुन।। ह्मणे सत्त्याग्रह करुं आम्ही तळ्याकारण।। (लटक्) परि धूर्त कुटिल नीतीला। पोरखेळ सर्व वाटला। तिनं सोडलं अखेर शेवटाला। तळें बुझविण्याच्या हुकमाला। दुखविले सर्व जनतेला। धर्मावर आली ही बला। असं पाहुन लोक खवळला। बजविले राज्यकर्त्याला। पर नाहीं मनीं उमगला। त्यानं उलट सर्व लोकांला। कायद्याचा धाक दाखविला। तंवा झाली अखेर सुरवात सत्याग्रहाला।। (चाल) प्रत्येक हिंदी रणवीर। युद्धास झाला तय्यार।। त्यांतही सर्वांच्या म्होरं। धनशेट्टी मल्ल खंबीर।। पाहोनि दुरूनचि ज्याला। तो गोरा कांपे थरथर।। मित्रांसह जाऊनि तेथें। निजलाच तळीं बिनघोर।। (लटक्) हें युद्ध असें घनघोर। चाललें पूर्ण तीन वार। असुरांसह लढती सुर। पाशवी सत्तेच्यावर। हा आत्मबलाचा वार। सर्वांनिं बांधुनियां जोर। गो-यास केलें उत्तर। मिळुनियां लोक आम्ही सारं। मरूनियां होऊं इथं ठार। सिद्धेश्वरां अर्पू निज-शीर। पर नाही बुझवुं देणार धर्ममंदिर।। असा केला सर्व लोकांनि जंवा निर्धार। तंवा गेला खचुनि सैतानी सत्तेचा धीर।। सत्याचा वाली तो अखेर परमेश्वर।। इश्वरी तंत्र अगोचरी, कळा महीवरी, जाणा सत्वरी। म्हणुनि सत्याचा विजय शेवटास। जाहला सोलापूर शहरास। 'सत्यचि धर्म' जाणा हा खास।। असा विजयध्वज रोंविला। परि गो-याला। खुपूं लागला। वीर मल्लप्पा काट्यापरमान्। होतसे सिद्ध हेंचि अनुमान। पुढं घडलेल्या गोष्टीनं जाण।।२।।

एकोणीसशें तीस सालांत, हिंदुस्थानांत, शहरोशहरांत। सर्व जनतेनं बांधुनिया जोर। पारतंत्र्याचा तोडण्या दोर। केली स्वातंत्र्यघोषणा थोर।। चहुं दिशी झाली आरोळी, सिंहकिंकाळी, 'करावी होळी। दुष्ट अंग्रेजी कायद्यांची सर्व सैतानी बंधनांची, बेडी तोडावी पारतंत्र्याची'।। (चाल) कार्यास केली सुरुवात प्रथम गांधिनं।। दांडीस मिठाचा कायदा तोडी जाऊन।। किती गोरे बघति टक्मका तिथं येऊन।। जनताही स्फूर्तियुत होय कार्य पाहुन।। तंवा दुष्ट कायदेभंगाचे माजले रण।। (लटक्) लहान थोर सर्व गावाला। परदेशी सर्व वस्तुला। जनतेनं बहिष्कार केला। समुद्राच्या जाऊन कांठाला। मिठाचा कायदा तोडिला। मदिरेच्या सर्व पिढ्याला। ठायीं ठायीं सत्याग्रह झाला। परदेशी कपडा सर्वांनिं त्वरीत जाळला।।

(चाल) पेटला होम जोरांत। या अखिल भरतखंडांत।। परदेशी वस्त्रांवरती। खादीने केली मात।। विद्यार्थी जाती न कोणी। शाळा कीं कॉलेजांत। जंगलचा कायदेभंग। प्रत्येक खेड्यापाड्यांत तैशीच चारी बाजूंनी। करबंदी चाले जोरांत।। (लटक्) पाहून अशा वणव्याला। गो-याच्या गो-या हृदयाला। जोरांत धक्का बैसला। पडला विचार व्हॉईसरायाला। तंवा कावा त्यानं लढविला। डुकरीचा कित्ता गिरविला। मनमानेल त्याच वक्ताला। नवे कायदे प्रसवू लागला। दिलं ऑर्डिनन्स नांव त्याला। तरी पायाखाली तुडविलं जनांनीं त्याला।। तंवा व्हॉईसरॉयही गर्भगळीत जाहला।। बंगल्यात बसुन मग डोकं खाजवू लागला।। अन् गो-या सुपिक डोक्यांतून विचार काढिला।। त्यानं लाठी गोळीबाराचा हुकूम सोडिला।। मग शस्त्रहीन प्रजेवर। करुनि गोळीबार। रक्ताचा पूर।। वाहविला अँग्ल लष्करानं। असा कित्येक ठायीं जाण। न्याय नीतिचा केला खुन।। राक्षसी लीला अघोर, बघुनि अशी थोर, सर्व देशभर; भडकला वन्ही अधिक जोरांत। गवसलं सोलापूरही त्यांत। ऐका घडलेला सर्व वृत्तांत।।३।।

माहे मेच्या आठव्या तारखेला, प्रकार असा झाला, सोलापुराला; कांहीं लोकांचा मिळुनिया संघ। गेला जंगलांत बांधुनिया चंग। केला जंगलाचा कायदेभंग।। लागलीच वार्ता पसरली, 'झाडं तोडिली, शिंदिची भली;' आली मग कलेक्टरची मोटार। अहो त्या साह्येबाची मोटार। घेऊन हत्यारी सैन्यसंभार। येतांच कलेक्टरानं, सूड बुद्धिंनं होउनि बेभान; करविला धाड्धाड् गोळिबार। झाले दोनचार लोकही ठार। तंवा बिथरली प्रजा अनिवार।। (चाल) त्या वक्ति कलेक्टरानं प्रसंग ओळखून।। पोलिसासह केलं मोटारितुन पलायन।। पर लोकसमूह गेला होता सर्व बिथरून।। तंवा धरली कितिक लोकांनी गाडी अडवुन।। कितिकांच्या डोळ्यांमधी खून गेला चढून।। (चाल) जातांच प्रथम वीरानं। स्वजनांत लाठी फिरवून।। ती सकल गर्दी हटवून। साह्येबाचे वांचविलें प्राण।। यापरी तत्त्व पाळून। कलेक्टराला दिले जिवदान।। पर हाय! त्याच कृत्यानं। घेतला पुढें तत्प्राण।। सर्पास दुध पाजून। केला दंश शेवटी त्यानं।। मनिं प्रसंग तो आठवुन। येतसे हृदय भरून।। (लटक्) काय सांगू राव गमतिला?। त्या ठायी ऐन वक्ताला। घेऊन लाठीबद लोकांला। मल्लप्पा नसता जर गेला। तर जाणा त्याच ठायाला। जंगलांत त्याच वक्ताला। यमपुरी दिसली असती त्या टोपीवाल्याला।। असा प्रसंग तिथं त्या वक्ती होता पातला।। पर ऐन वक्ती मल्लप्पा वीर धांवला।। तरि दाखविलं सर्पानं आपल्या जातिला।। तो ऐका ऐका प्रकार सर्व घडलेला।। इंग्रजी न्यायाचा देतो खासा दाखला।। गर्दी हटतांच मोटारगाडिला, रस्ता जंवा

झाला, पळुनि तंवा गेला; कलेक्टरसाहेब बंगल्यावर पार। परि जातांना पुन्हां एकवार। लोकांवर केला त्यानं गोळीबार।। असं आगिंत तेल ओतुन, कलेक्टरानं केलं पलायन; तेव्हां अति त्वेष चढला लोकांस। शेवटी शांत कराया त्यांस। तोड उमजेना कोणां एकांस।। पाहून असा हा प्रकार, मल्लप्पा धीर, घेऊन निजवीर; निघुनिया गेला अखेर गावांत। परि काय घडलं इकडं जंगलांत। ऐका इतिहास पुढल्या चौकांत।।४।।

शेवटच्या गोळीबारानं, सर्व प्रजाजन, अधिक भडकून; होत क्रोधायमान् अनिवार। 'मरूं की मारूं' केला निर्धार। मल्लप्पाही आतां काय करणार?।। कालस्य कारणम् राजा, मुळिं न ती प्रजा, असा हा ताजा; जंवा अनुभव पुन्हां आला। तंवा मग वीर मल्लप्पाला। खरा प्रकार कळुन चुकला।। तरि तत्त्वासाठी वीरानं, लोकांचीं मनं वळविण्या जाण; प्रयत्न केला पुन्हां एकवार।। परि जन चिडले होते अनिवार। ह्मणुनि त्याचाही झाला धिक्कार।। (चाल) तंवा गेला तिथुन निरुपाय होऊन तो वीर।। मग इकडं तुफान झालेला लोकसागर।। आदळला जाऊन पोलिस चौकिच्या वर।। काय वानुं आता तो पुढील घोर प्रकार?।। ऐकून होतसे गुंग खुद्द शाहिर।। (लटक्) जे वेळी गर्दी ती महान। चौकिवर गेली चालुन। तंवा झाली खूप मारहाण। इतक्यांत कोणी एकानं। चौकिला आग लावुन। टाकली चौकी तिथं जाळुन। त्याचपरि कितीक लोकांनं। केला कोर्टाचाही सन्मान। अविचार परि हा जाण असा वखत मोठा दारुण। कारण की त्याच योगानं। पोलीसही जळुनशान् खाक झाले त्यांत दोन।। (चाल) पुन्हां वार्ता गेली ही घोर। साहेबांच्या बंगल्यावर।। तें वेळी गो-या डोक्याचा। कसं चाले पहा चक्कर।। घेऊन खूप लष्कर। मग आले नथनीबहादुर।। आणि गर्दी गांवाबाहेर। हा गावांत करतो गोळीबार।। पहा पहा कसा कलेक्टर। अकलेचा कांदा हुशियार।। सोमेश्वरी दंग्याचा जोर। रामेश्वरी ह्याचा गोळीबार।। (लटक्) अशा सैतानाच्या लीलेनं। कांहीं एक नसतां कारण। किति लोक होत हैराण। कितिकाचे हरपले प्राण। गुन्हा नसल्याविण किति मेले त्यांची गणती न।। पोरंबाळं खेळती रस्त्यानं। बायाबापड्या झाडती आंगण। त्यांच्याही वरती झाडली गोळी नीचानं।। मग गोळीबाराचा आवाज तो ऐकुन जंवा गर्दी आली गांवात सर्व धावुन।। तंवा गेली उडुन साह्येबाची पुन्हा गाळण।। तो पळ काढि मग मोटारिंतून भुर्कन।। यापरी सूडबुद्धीनं, सूड उगवून, कलेक्टरानं; जीव घेऊन केलं पलायन। तरी त्याचं शांत होईना मन। पहा मग गोरं अकली धोरण।। रातोरात कलेक्टरानं, गांठलं पुणं, करुनि टेलिफोन; ताफा मागविला लष्कराचा। हुकूम सोडिला मार्शल लॉचा। ऐका वृत्तांत मग

पुढचा।।५।।

पुढं त्याच बारा तारखेला, अस्तमानाला। अकस्मित झाला। धड्ड्ड्धा गोळिबार गावांत। चमकल्या मशिनगन्स रस्त्यांत। लष्करी कायदा आला अमलांत।। इंग्रजी कायद्यांची वाण, जहरी कुंपण, त्यांतही जाण; लष्करी कायद्याचा अंमल। जिथं जाईल तिथं कत्तल। सोलापुरची ऐका दंगल।। (चाल) जंवा सोलापुरी लष्करी शिस्त जाहली।। तें वेळी राक्षसांनांही लाज वाटली।। अशी घोर कृति गो-यांनी तिथं दाविली।। निःशस्त्र प्रजेवरी गोळी खुप झाडली।। (लटक्) प्रत्येक गल्लीबोळाला। गोळीबार स्वैर सोडला। धड्डड्ड्ड् आवाज चालला। कोणीही गवसो गो-याला। गोळि घालुन ठार करि त्याला। कुणी रस्त्यावरिच मारिला। कुणां ओटीवरिच ठार केला। कुणां माडिवरती पाहिला। खिडकिंतुन गोळी घाल त्याला। पुजा-याचा मुडदा देवळाला। मशिदीत मुल्ला निजविला। किति लेकरं खेळती रस्त्याला। ठोकरांनी उडवुनिया ठार केलं बाळांला।। (चाल) मांडिला असा अविचार। दैवाचा उलटा जोर।। घरामधीं शिरुनियां चोर। मालका मारी बेमार।। पाशवी नीच सत्तेचा। अबलांवरी अत्याचार।। 'झडकरी धांव त्रिपुरारी। भूमीते झाला भार'।। (लटक्) असा घोर शब्द उमटला। त्या सोलापूर शहराला। सारा लोक दीन झाला। घरामधला घरांत कोंडला। किति अन्नपाण्याविण मेला। कडीं कुलपं लागलीं दाराला। किती गांव सोडुन शांन् गेला। सारा गांव ओस जाहला। जणुं स्मशान्भूमिचा भास भासुं लागला।। अशी तीन महिने तो केली सैतानि लीला।। तरि इतक्यानंही सैतान नाही शांतला।। त्यानं कोंडलं धरुन् तुरुंगांत; राहिल्या साहिल्यांला।। त्यांतही मुख्य मुख्यांला। चार मोह-यांला सिंहबच्चांला; फांसावर केलं लटकावुनि ठार। सारडा, शिंदा, हुसेन गुलजार। चौथा मल्लप्पा वीर आधार।। हाय्! हाय्!! झाला हाःहाकार, सर्व देशभर घोर अंधार, पेटला वाटे वणवाही खास। गेले स्वातंत्र्यदेवीचे दास। जाहला शोक सर्व हिंदास।।६।।

फांशिचा हुकुम ऐकून, सारा हिंदुस्थान, झाला उद्विग्न; बोलला एकमुखानं त्यास। सिमल्याच्या व्हॉइसरॉय साहेबास। 'नका तुह्मी मारूं निरपराध्यांस।। धनशेट्टी मल्लप्पा यानं, खरोखरी जाण, मोठ्या धैर्यानं; वांचविले कलेक्टराचे प्राण। असे लक्षांत घेऊन ही जाण। द्यावं वीरातें तुह्मी जीवदान'।। हजारो तारा अशा गेल्या। व्हॉइसरॉयाला, परि दगडाला; सांगा पाझर कसा फुटणार?। सर्प निजजात कशी भुलणार। कसा दैत्याचा देव होणार?।। (चाल) पाण्यवानि पैसा

अपिलांत खर्च जाहला।। किततिरि व्हॉइसरॉयाच्या तारेपायी गेला।। तरि नाहीं अखेर दगडाचा देव पावला।। तंवा खटला गेला शेवटीं पार्लमेंटाला।। (लटक्) आठ महिने प्रकार असा झाला। पार्लमेंटनं निकाल मग दिला। 'मिस्टर मल्लप्पा भला। टुमचा अर्ज इठं पहुचला। आह्मी वाचुनशनी टो पाहिला। खुप इचार तेच्यावरती केला। द्यावी वाटल माफी टुंह्माला। पण कायदा आडवा मधी आला। तंवा आमचा नाइलाज झाला। लई वाईट वाटलं आम्हाला। 'फाशीचीच सजा टुमची कायम केली;' ह्मणण्याला।। असा पार्लमेंटातुन निकाल शेवटी लागला।। एकोणीशसें एकतिस जानेवारिला।। सोमवारी बारा तारखेला दुस-या प्रहराला।। यरोड्याच्या तुरुंगांत सजा होईल टुंह्माला।। इश्वर शांटि डेईल टुमच्या आत्म्याला।। राक्षसी हुकुम असा आला, कळला वीराला, तोही मग झाला; प्राणावर देशासाठी उदार। बोले मृत्यूस कोण डरणार। केला वीराने पूर्ण निर्धार।।७।।

फांशीच्या आदल्या दिवसाला, अकरा तारखेला, रविवारला; वीर बाळाची भेट घेण्यास। आले, ते वेळी मातापिंतयांस। शोक अनिवार होय सकलांस।। जशी हरिणी बघुन पाडसाला, शेळी कोंकराला, अथवा वासराला बघुनिया हंबरडा फोडिते गाय। तशिच तें वेळी वीराची माय। फोडि हंबरडा मोकलुनि धाय्।। मातेचें हृदय तें जाण, प्रेमाची खाण, फोडि पाषाण; न्याय हा सत्य जगतांत। दाटला प्रेमपान्हा हृदयांत। लोटे मग अश्रुपूर नयनांत।। शेवटची रात्र ती साची, होती आयुष्याची, परि बाळाची; माता तें वेळी कवटाळुनि त्यास। करी आक्रोश सांडि निःश्वास। हाय? दुर्दैवा!! काय तो भास।। (चाल) जें वेळी यज्जननी शोक दारुण।। ती रात्र जणूं अघोरी वाटे भयाण।। परि घटकोघटकी ये काळ जवळी पाहुन।। बोलला बाळ मातेचं करुनि सांत्वन।। तो शेवटचा संदेश घ्यावा ऐकून।।

(चाल- पाळण्याची)

'हे प्रिय जननी होऊं नको मनिं कष्टी। सिंहचि ये सिंहाचे पोटीं।।धृ.।।
अशी हंबरडा फोडुनिया तूं आई। कां रडसी धायीं धायीं?।।
जरि अन्यायें फांशी मजला दिधली। न्यायाचें नांवाखाली।।
तरि स्वर्गीचा न्याय सत्य तो जाण। त्याचा न कधीं हो खून।।
मज देतील येथें फांशीं, परि जाईल मी स्वर्गासी,
त्या न्यायी प्रभुचे पाशीं। मग देईल तो न्याय मला जगजेठी। सिंहचि ये।।१।।
उपकाराची फेड पहा माते। अपकारे हो या जगती।।

ज्या सर्पांतें पाजविलें मी दूध। त्यानेंच केला मम घात।।
कलियुगांत या न्यायचि उलटा जाण। कर्माची गति ही गहन।।
जगीं धन्या धतूरा मिळतो, चोर तो मलिदा खातो,
त्यावरही मोर कुणी होतो, ही सैतानी पाशवी सत्ता खोटी। सिंहचि ये.।।२।।
तो फास नव्हे, खास! परी स्वर्गीचें मज विमान गमते साचे।।
तें वाहन मी विकत घेतलें काल। प्राणाचें देवुनि मोल।।
उलटतां निशा बसेन मी त्यांत। इतरांची नाही मात।।
येतील यमाचे दूत, करतील माझी तैनात,
मशीं नेतील ते मिरवित, हे भाग्य असें दुर्मिळ अवनीवरती। सिंहचि ये.।।३।।
हे मरण असें निजदेशास्तव साचे। नशिबात असे कोणाचे?।।
बहु लागतसे त्यास वाडवडिलांची। पुण्याई पूर्वजन्मीची।।
जो वीर गडी तोचि तिथें जाईल। स्वर्गीचें सुख पाहील।।
तो नंदनवनिंचा झोका, मर्दचि त्यावरी बाका,
घेईन बसुनियां झोंका, नच इतरांच्या पुण्य असें हे गांठी। सिंहचि ये.।।४।।
हा शोक तुझा वृथा असे गे माते। कारण कीं वदतों तूंतें।।
का मरण असे सांग कधीं आत्म्यासी। तो अमरपूर-रहिवासी।।
जग सोडतसे देहचि नश्वर एक। वाहतो दुजा यत्शोक।।
तुज जन्मोजन्मी माते, किति पुत्र जाहले होते;
परि आज कुठें असती ते? हे सांग मशीं जगताची या रहाटी। सिंहचि ये।।५।।
ज्या दुष्टांनी निर्दय शिक्षा ऐसी। माते गे दिधली मजसी।।
प्रभु त्यांचेही करिल अखेर निवाडे। अधमाधम देतील झाडे।।
मम नांवाच्या ओव्या गातील भगिनी। झडती नौबती भुवनी।।
मम कीर्ति ते ऐकोनि, शाहिर मज गातील गाणीं,
कड्कडेल डफ थापांनीं, की 'मेला तो मल्ला देशासाठी'। सिंहचि ये.।।६।।
ही वेळ नव्हे आई आतां रडण्याची। परि गुजगोष्टी करण्याची।।
घे बोलुनिया गोष्टी आतां प्रेमानें। दे निरोप आनंदानें।।
ही अखेरची भेट असें समजून। घे पाहुन डोळे भरून।।
जातांच घडी उलटून, ते काळ इथें येऊन,
नेतील मला ओढून, मग तुझी माझी होईल ताटातूटी। सिंहचि ये.।।७।।
मनिं समज आतां या पुढती तूं आई। पुत्रचि जाहला नाहीं।।

मम पाठीशी अद्यापिही देख। सिंहाचे बच्चे कितिक।।
मम रक्ताच्या थेंबासरशी जाण। होतील वीर निर्माण।।
तैसाचि बाळही माझा, तो वीर दहा वर्षाचा,
निपजेल छावा सिंहाचा, होईल जगीं कूळ धन्य धनशेट्टी। सिंहचि ये.।।८।।

यापरी भविष्यार्थाने गेला बोलुन, बाळ तो जाण परी तें मातृहृदय सुकुमार। कसं इतुक्यानं शांत होणार? तृष्णा मृगाजलें कशी शमणार।। प्रेमाचा जाळ या जनि, मोठा मोहनी, जातां परतोनि; पाहे फिरफिरुनि मागं जननि। जशी पाडसांस पाहाते हरिणी। हृदय कळवळे दृश्य बघुनि।।८।।

सोमवारच्या दुस-या प्रहराला। पहांटे चाराला, वीर बाळाला; आमंत्रण आलें देवाघरचें। उतरले दूत यमाजीचे। विमान तय्यार झाले फांसाचें।। बाळानं केली तय्यारी, तेचि अवसरी, होते बरोबरी; मित्र त्रिपुरारी दूजेही तीन। होऊनियां ईशनामीं तल्लीन। झालं स्वातंत्र्यदेवी पदें लीन।। फांसावर जात समयाला, चौघांनीही केला, जयजयकार भला; 'बोलो स्वातंत्र्यदेविकी जय्! महात्मा गांधीराज की जय्!!। और सब हिंदुस्थानकी जय्!!।। (चाल १) फांसाच्या जवळ जाऊन अंतसमयाला।। मल्लप्पा टोपीवाल्यांस काय बोलला? अर्पितो प्राण आह्मी आज आमच्या देशाला।। त्यापरी तुम्हींही अर्पावें आपल्या देशाला।। (लटक्) बोलून इतकं प्रेमानं। फांसावर उभं राहुन। प्रार्थना केली वीरानं। आठविला मनीं भगवान। गांधीचें करुनियां ध्यान। राष्ट्राचा मंत्र जोरानं। 'वंदेमातरम्' गर्जुन। लटकवली मान फासात आनंदे त्यानं।। (चाल) देतांच मान फांसला। दुष्टांनी फांस चढविला।। हाय्! हाय्!! पुढें मग काय?। जे वेळी हुकूम फर्मिला।। तो प्रसंग निर्वाणीचा। वर्णवे न शाहीराला।। आठवून दृश्य तें घोर। अंगावर कांटा आला।। (लटक्) गेला गेला वीर तो गेला। स्वातंत्र्यहिरा हरपला। स्वर्गाचा तारा तुटला। राष्ट्राचा मोती फुटला। सोलापूरचा रवि मावळला। वयोवृद्ध वीर जनकाला। त्या रेवणसिद्ध आप्पाला। उतारवयांत पुत्रवियोगाचा गिरी कोसळला।। भेटीच्या वेळीं म्हातारा मूर्च्छित पडला।। सा-या हिंददेशासही शोक अनावर झाला।। त्याच वक्ति कवि सिद्राम होता येरोड्याला। बंदिवासामधिं पोवाडा त्यानं हा केला।। धनशेट्टी आदि प्रभृतीच्या चरणी अर्पिला।। तो हंसक्षीर न्यायानं, सकल जनतेनं, प्रेमें वाचून, द्यावं अवधान शाहीराला।। ऐकावं वीर गायनाला।। हिंददेशाच्या कहाणीला।। स्वातंत्रहि-यांचीं खाण, देश हिंदुस्थान, वीरा नच वाण, परि फितुरीच्या बेडिनं त्यास।। पारतंत्र्याचा लाविला फांस। झाला रणसिंह परांचा दास।।९।।

## प्रश्नावली

प्रश्न १ : पुढील प्रश्नांची प्रत्येकी ८ ते १० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. धारवाडच्या कलेक्टराने कित्तुर संस्थान खालसा केल्याचा हुकूम का फर्माविला? २. धारवाडच्या कलेक्टराने रुद्रम्मा आणि चन्नम्मा राण्यांना कोणता निरोप पाठवला? चन्नम्मा राणीने कलेक्टरला कोणते उत्तर दिले? ३. इंग्रज सैन्य आणि कित्तुरचे सैन्य यांच्यात झालेल्या युद्धाचे तुमच्या शब्दांत वर्णन करा. ४. कित्तुरचा किल्ला इंग्रज सैन्याला प्रथम का जिंकता आला नाही? ५. इंग्रज सैन्याने कित्तुरचा किल्ला नंतर कोणामुळे आणि कसा जिंकला?६. सोलापुरात 'मार्शल लॉ' का जाहीर करण्यात आला? ७. सोलापुरात 'मार्शल लॉ'चा अंमल किती महिने चालला? या काळातील अत्यंत भीषण वातावरणाचे वर्णन तुमच्या शब्दांत करा. ८. फासावर जाण्यापूर्वी वीर मल्लप्पा यांनी कोणाकोणाचा जयजयकार केला? सिद्राम शाहिराने त्यांच्याबद्दल कोणते गौरवोद्‌गार व्यक्त केले आहेत?

प्रश्न २ : पुढील प्रश्नांची प्रत्येकी २० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. राणी चन्नम्माचा युद्धातील पराक्रम विशद करा. २. राणी चन्नम्माशी कोणी व कशी फितुरी केली? त्याचा परिणाम काय झाला? ३. राणी चन्नम्मा, रुद्रम्मा यांचा आणि त्यांच्या सुनेचा शेवट कसा झाला? ४. कोणत्या कारणामुळे वीर मल्लप्पा इंग्रज अधिका-यांना काट्यासारखा वाटू लागला? ५. भारत देशात इंग्रजाविरुद्ध कायदेभंगाची चळवळ प्रथम कोणी केली? कायदेभंगाची चळवळ देशभरात कशा स्वरूपात पसरली? ६. फाशीची शिक्षा जाहीर झाल्यावर वीर मल्लप्पास भेटण्यास गेलेल्या त्यांच्या मातेची शोकमग्न स्थिती विशद करा.

प्रश्न ३ : (अ) खालील वाक्यांतील रिकाम्या जागी कंसात दिलेल्या शब्दांपैकी योग्य शब्द भरून वाक्ये पुन्हा लिहाः–

१. तंटा लावलेल्या जंगमाने ........ यास किल्ल्यावर हल्ला करण्याची खास जागा दाखविली. (थॅकरे / चॅपलीन). २. .... राणी चन्नम्माचा शूर व विश्वासू सरदार होता. (संगप्पा / बाळप्पा). ३. राणी चन्नम्माने .... नदीत उडी टाकली. (मलप्रभा / घटप्रभा)

(ब) खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहाः–

१. सिद्धेश्वर तलाव बुजवला जाऊ नये यासाठी वीर मल्लप्पा आणि त्यांच्या साथीदारांनी कोणता निर्धार केला? २. सोलापुरातील लोकांनी पोलीसचौकी का जाळली? ३. सोलापुरातील चार हुतात्म्यांची नावे लिहा. ४. सिद्राम शाहिराने हुतात्मा मल्लप्पाचा पोवाडा कोठे लिहिला?

प्रश्न ४ : खालील विषयावर प्रत्येकी १० ते १२ वाक्यांत टीपा लिहाः–

१. १९३० सालची कायदेभंगाची चळवळ. २. वीर मल्लप्पा यांनी आपल्या मातेचे केलेले सांत्वन. ३. 'मार्शल लॉ'च्या काळातील इंग्रज सैनिकांची सैतानी कृत्ये.



# ६ गीत

गीत हा काव्यप्रकार जुन्या काळापासून लोकप्रिय आहे. अभंग हा वेगळा काव्यप्रकार मानला जात असला तरी ब-याच संतांचे अभंग भावगीताच्या पातळीवर पोहोचले आहेत. एखादी भावना उत्कट शब्दांत व्यक्त करणे म्हणजे गीत. वीरशैव कवींनी मोठ्या प्रमाणावर गीतरचना केलेली आढळते. येथे काही निवडक गीते प्रातिनिधिक म्हणून निवडली आहेत.

## १. श्रमधर्माचे प्रतीक सुंदर

**कुमार कोठावळे** (१-७-१९२० ते २-१-१९९८) : गंगाधर धोंडो कोठावळे हे यांचे पूर्ण नाव. यांनी कुमार कोठावळे या नावानेच सर्व लेखन केले. विदर्भात वर्धा जिल्ह्यातील रसूलाबाद येथे जन्म. पुढील आयुष्यात भटकंती करून सोलापूरला स्थायिक. म. बसवेश्वर, माझा गाव माझी माणसं इत्यादी नऊ नाटके, दोन नाटिका, गीत सिद्धेश्वर, गीत बसवेश्वर, गीत सोमेश्वर, शिवयोगी मन्मथस्वामी : चरित्र, वाङ्मय व कार्य आदी बरेच लेखन यांच्या नावावर आहे.

प्रस्तुत गीतात सिद्धरामेश्वरांनी सोलापूरला तलाव खोदण्याचे जे कार्य केले ते सामान्य नसून श्रमधर्माचे प्रतीकच होय, असे कवी सांगतो. श्रमाला प्रतिष्ठा देणा-या सिद्धरामांच्या व्यक्तिमत्त्वाचे या गीतात दर्शन घडते. प्रासादिक व सफाईदार रचना हे कोठावळे यांचे वैशिष्ट्य येथे दिसते.

श्रमधर्माचे प्रतीक सुंदर
नवे निर्मिले रम्य सरोवर।।धृ.।।

सुहासिनींनी भूमि पूजिली
क्षणात जमली शिष्यमंडळी
गंगा दाराशी ही आली
सर्व नद्यांचा संगम हा तर।।१।।

कुदळ घेउनी अपुल्या हाती
सिद्धरामही भूमी खणती
शिष्यमंडळी ते अनुसरती
एक भावना एकच अंतर।।२।।

पाताळातुनी अमृत आणुन
सरोवरी त्या दिधले सोडुन
अमृतलिंगही केले स्थापन
पावन केला सारा परिसर।।३।।

सिद्ध श्रमाची महती सांगे
सर्व जनांना केले जागे
'कष्ट हाच कैलास' जाणिजे
विनम्र वाणी श्रृतीमनोहर।।४।।

सदा दर्शना रीघ लागली
भक्त पूजिती गुरुमाऊली
चहूंकडे सत्कीर्ति पसरली
मल्लिकार्जुन शोभे मंदिर।।५।।

**शब्दार्थ :**

अनुसरती = अनुकरण करतात. अमृतलिंग = तलावाच्या काठावर स्थापिलेल्या लिंगाचे नाव. श्रृतीमनोहर = कानाला गोड वाटणारे.

## २. मंगलमय श्रीजगद्‌गुरू

**रंगनाथ नाथराव जोशी** : तुळजापूर येथे वास्तव्य. विपुल गद्यपद्य लेखन. एकूण १२ पुस्तके प्रकाशित. त्यामधील एक 'श्रीकाशीजगद्‌गुरू चरित्रगंगा' हे एक आहे. विद्यमान श्रीकाशीजगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांचे चरित्र त्यांनी चौदा गीतांतून गाईले आहे. श्री. जोशी हे वीरशैव नसले तरी त्यांनी वीरशैव सत्पुरुषांवर लेखन केले आहे.

श्रीकाशीजगद्‌गुरूंच्या चैतन्यमय, भक्तोद्धारक, ज्ञानसंपन्न व्यक्तिमत्त्वाचे या गीतात कवीने अत्यंत नेमक्या शब्दांत वर्णन केले आहे. कवीची रचना प्रासात्मक व संस्कृतप्रचुर असल्याची साक्ष येथे मिळते.

मंगलमय श्रीजगद्‌गुरू।
अवघे पावन नाम स्मरू।।धृ.।।

काशीश्रीजगद्‌गुरू श्रीचंद्रशेखर। शिवयोगी ते थोर खरोखर।
वचन तयांचे ध्यानी धरू...

श्रीगुणगायन मधुसंजीवन। चैतन्याचे चिन्मयदर्शन।
गुरुवचनाते नित अनुसरू...

श्रीसत्संगे झणि उद्धरती। संप्रदाय अन् मानव, जाती।
चिदानंदजप नाम करू...

प्रखर पंडिती बोधरसामृत। प्राशुन साधा आपुलाले हित।
जना तारूनि आपण तरू...

ज्ञानमूर्ती ही साक्षात्कारी। भक्तोद्धारक भवभयहारी।
श्रीपदस्पर्शे चला उद्धरू...

प्रवचन निरूपण कधी दर्शनी। दासा दिसती विविध रूपांनी।
श्रीरूपाते हृदयी भरू...

**शब्दार्थ :**

श्रीगुरुगायन मधुसंजीवन = जगद्‌गुरूंच्या गुणांचे गायन करणे हेच अमृतासारखे मधुर व संजीवक होय. श्रीसत्संगे = जगद्‌गुरूंच्या सत्सहवासाने, झणि = तत्काळ, पंडिती = पांडित्यपूर्ण. बोधरसामृत = अमृतासारखा उपदेश, उपदेश हेच जणू अमृत. भक्तोद्धारक = भक्तांचा उद्धार करणारे. भवभयहारी = संसाररूपी भीतीचा नाश करणारे, श्रीरूप = जगद्‌गुरूंचे रूप.

## ३. वर्षे झाली हजार

**श्रीमती प्रमिलाबाई कोठाळकर** : सौंसर, जि. छिंदवाडा (मध्यप्रदेश) येथे वास्तव्य. विदर्भात साखरखेर्डा (जि. बुलडाणा) येथे श्रीपलसिद्धस्वामींचा मठ आहे. पलसिद्ध बसवपूर्वकाळात होऊन गेले. कवयित्री पलसिद्ध-मठाची शिष्या असून त्यांची पलसिद्धभक्तिपर गीते 'श्रीसिद्धगीतावली' या पुस्तिकेत संग्रहित झाली आहेत.

श्रीपलसिद्धांच्या हजार वर्षांपासून भरणा-या दरबाराचे येथे सुरेख काव्यमय वर्णन केलेले आहे. मठातील ध्यान, पूजा, पारायण, आरती, भजन, नामस्मरण, कीर्तन, प्रवचन आदी कार्यक्रमांच्या वर्णनाबरोबरच शारीर व्याधी दूर व्हावी, संपत्ती मिळावी म्हणून

आलेले भक्त आणि मोक्षार्थी भक्त यांचाही येथे सूचक निर्देश आढळतो.

नवल कसे ना कळे कुणाला, वर्षे झाली हजार
पलसिद्धांचा भरतो कसा दरबार!।।धृ.।।

करिती ध्यान पूजा जप, कोणी बैसे पारायणी
कुणि आरती भजनी नाचती सिद्धप्रभूच्या अंगणी
कीर्तन-प्रवचनी सतत चालतो नामाचा भडिमार।।१।।

कुणी आंधळा मागे डोळा, पंगू मागे काठी
दीनदरिद्री द्रव्यासाठी, दास मुक्तीसाठी
शरणांगत आल्याचा करितो क्षणात हा उद्धार।।२।।

कीर्ती ऐकूनि दूरदुरूनि चरणाजवळी येती
कल्पतरूच्या छायेखाली झोप सुखाने घेती
स्वानंदाचा रस चाखिता झाले कुणि न बेजार।।३।।

## ४. पद स्पर्शाया जाता पुढती

**रेवणसिद्ध राचप्पा मगाई** (जन्म १२-४-१९३०) : सोलापूरच्या सिद्धेश्वर प्रशालेतून शिक्षक, पर्यवेक्षक व मुख्याध्यापक म्हणून सेवानिवृत्त. श्रीसिद्धरामेश्वरांची वचने, अक्कमहादेवींची वचने यांचा अनुवाद. समीक्षात्मक व शैक्षणिक लेखन. रुद्राध्यायाचा व सूक्ष्मागमाचा अनुवाद.

प्रस्तुत रचनेत अक्कमहादेवीच्या अंतःकरणातील मल्लिकार्जुनदेवतेच्या दर्शनाविषयी असलेली आर्तता व्यक्त झाली आहे. आकाशगंगा, तारे, डोलणा-या वेली, पुष्पे अशा प्रसन्न व सुगंधी वातावरणात तिला मल्लिकार्जुनाचे दर्शन होते. पाऊल स्पर्शू जाताच ते रूप चराचरात विलीन होते. मग विरहार्ता अक्कमहादेवी मल्लिकार्जुनाला आपल्या दिव्य रूपात स्वतःला सामावून घेण्याची विनवणी करते, असा या कवितेचा आशय आहे.

अशाच एका स्वप्निल रजनी
एकलीच मी बाहेर पडले
मीलनस्थलि अन् कशि का गेले
मुळीच मजला नाही कळले

ब्रह्मांडाच्या देहलिवरती
चमकत होत्या रत्नज्योती
प्रकाशगंगा दक्षिणउत्तर
धूसर फेनिल वाहत होती

मंदमदुलतर अनिलगणासह
वेली पुष्पे डोलत होती
धुंद सुगंधी वातावरणी
अवघी अवनी हासत होती

शुभ या समयी तुजला स्मरता
रूप तुझे मम नयना दिसले
पद स्पर्शाया जाता पुढती
चराचरी ते विलीन झाले

किती दिवस तू असाच छळसी
विरह तुझा मी साहु न शकते
मल्लिकार्जुना, दिव्य स्वरूपी
सामावुन घे मजला पुरते!

**शब्दार्थ :**

स्वप्निल = स्वप्नासारखी. देहलिवरती = उंबरठ्यावर. प्रकाशगंगा = आकाशगंगा. मंदमृदुलतर अनिलगणासह = मंद व मृदू वा-याच्या झोताबरोबर. अवनी = पृथ्वी. रजनी = रजनीत, रात्रीच्या वेळी. रत्नज्योती = प्रकाशणारी नक्षत्रे, तारका. फेनिल = फेसयुक्त.

## ५. आले तुझ्या मी दारी

**शकुन** (जन्म ३-१२-१९३४) : सौ. शकुंतला शंकरअप्पा अनसिंगकर. विदर्भात वाशीम येथे वास्तव्य. प्राथमिक शिक्षिका म्हणून सेवानिवृत्त. वीरशैव व वीरशैवेतर अनेक संत-सत्पुरुषांवर यांनी रचलेली गीते त्या भागात लोकप्रिय आहेत. 'श्रीरमतेराम भक्तिगीते' नामक गीतसंग्रह प्रकाशित. 'शकुन' या नाममुद्रेने सर्व लेखन केले.

प्रस्तुत गीतात 'मला सांसारिक सुखाची अपेक्षा नसून माझे अंतरंग उघड' अशी आगळी भिक्षा कवयित्रीने शंकराजवळ मागितली आहे.

आले तुझ्या मी दारी घेऊनिया ही झोळी
मज भीक घाल शिवा, सर्वांहूनि निराळी।।धृ.।।

अन्नाची नाही आशा तृष्णा मला जलाची
धनवैभवाची नाही आशा मला कशाची
आशा गुरुकृपेची हृदयात एक उरली
मज भीक घाल शिवा, सर्वांहूनि निराळी।।१।।

अज्ञान-अंधकारी मायेत जीव भ्रमला
महादेव अंतरीचा नयनास नाही दिसला
मागे कशी वळू मी, झोळी अजून खाली
मज भीक घाल शिवा, सर्वांहूनि निराळी।।२।।

मन हे अता रमेना बहिरंगी या जगात
उघडी रे अंतरंग, किल्ली तुझ्या करात
द्यावी अशीच भिक्षा कोण्या सरे न काळी
मज भीक घाल शिवा, सर्वांहूनि निराळी।।३।।

मिळता मनुष्यजन्म जावो शिवा, न वाया
हातात हात घेई ठेवी तुझ्याच पाया
'शकुन' म्हणे ही भिक्षा, देई मला निराळी
मज भीक घाल शिवा, सर्वांहूनि निराळी।।४।।

## ६. लागले वेड शिवदर्शनाचे

**शिवदासी** (जन्म मे १९३८) : श्रीमती शोभा शंकरराव मुखेडकर या भक्तिमार्गातील गृहिणी नांदेड येथे वास्तव्य करतात. त्यांचा काव्यसंग्रह 'पुष्पांजली' या नावाने १९९५ साली प्रसिद्ध झाला आहे. यांची रचना गेय असून तिच्यात उत्कट भक्तिभावना, सरलता, माधुर्यप्रसादादी काव्यगुण दिसून येतात.

कुणी म्हणती मज वेडी खुळी
कुणी म्हणती मज झाली बावरी
कुणा कळेल दुःख माझे
मी सांगू कशी हे जगाते। मज लागले वेड शिवदर्शनाचे।।धृ.।।

जळी स्थळी काष्ठी पाषाणी
शोधिते मी बाई शूळपाणी
आतुर लोचने पाहावया। रूप सदाशिवाचे।।२।।

पद म्हणती जाऊ राऊळाला
कर म्हणती वाहू शत बिल्व शिवाला
आतुर झाले शिरकमळ हे। घेण्या दर्शन शिवाचे।।३।।

गाणे गाऊन मुखही सुकले
टाळ वाजवूनी करही दमले
अबोल झाले तुजवाचूनी। देवा, सूर वीणेचे।।४।।

दो नयनाच्या निरंजनात
पंचप्राणाची लावुनी ज्योत
वाट पाहते 'शिवदासी' मी। अर्पिण्या काया तव चरणाते।।५।।

## ७. नवा मनू आला

**शे. दे. पसारकर** (जन्म १८ ऑगस्ट १९५२) : शेषनारायण देवाप्पा पसारकर. विदर्भातील केकतउमरा (ता. जि. वाशीम) येथे जन्म. वास्तव्य सोलापूर येथे. वीरशैव मराठी वाङ्‌मयाचे संशोधक, संपादक, लेखक म्हणून प्रसिद्ध. 'जन्म हा अखेरचा' (अनुवाद), 'श्रीलक्ष्मण गाथा' (संपादन), 'वेलु गेला गगनावेरी' (कादंबरी), 'चंद्रसावली' (कवितासंग्रह) 'श्रीमन्मथशिवलिंगकृत परमरहस्य' (संपादन), 'अमृताचा घनु' (भाष्य) इत्यादी पंचवीसपेक्षा अधिक ग्रंथ प्रकाशित. विपुल ललित लेखन, 'विभूती वैभव' त्रैमासिकाचे १३ वर्षांपासून संपादन. पहिल्या अखिल भारतीय वीरशैव मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष (लातूर, १८-१९ डिसेंबर २००४).

म. बसवेश्वरांच्या चैतन्यमय, क्रांतिकारक कार्याचे तेवढ्याच चैतन्यमय व प्रासादिक शब्दांत कवीने येथे वर्णन केलेले आहे. कवीच्या गीतरचनाकौशल्याचा या गीतात प्रत्यय येतो.

समतेचा डिंडिम गर्जला, अरुणोदय झाला
तुझ्या रूपे श्रीबसवा, भूवरि नवा मनू आला!

सत्य-अहिंसाधर्म झळाळुन जागे मानवता
प्राण फुंकूनि तू कल्याणी जागविली समता

मनामनांतुन सुस्वर जुळले, किल्मिषही सरले
'मानव सारे एक' बोल हे नभांतरी घुमले
तुझिया स्पर्शे देह धरेचा हर्षे रोमांचला...
तुझ्या रूपे श्रीबसवा, भूवरि नवा मनू आला!

श्रममंत्राने तुझ्या गर्जले अंतराळ अवघे
कल्याणीचे पथ गजबजले शरणांच्या ओघे
हिरावलेली ज्यांची होती युगेयुगे वाणी
मुक्या गळ्यांतुन तूच पेरिली सत्त्वशील गाणी
अनुभावांच्या वचन-प्रवाही मंटप पाझरला...
तुझ्या रूपे श्रीबसवा, भूवरि नवा मनू आला!

उंबरठ्याच्या आतच चिणले होते जे श्वास
करूनि मोकळे त्यांस दाविला जागृतीचा दिस
ओठांमधूनि त्यांच्या झरले अमृत वचनांचे
विमुक्त कुंतल सोडूनि अक्का महादेवि नाचे
तुझ्या यशाचा त्रिवार डंका गगनी दुमदुमला...
तुझ्या रूपे श्रीबसवा, भूवरि नवा मनू आला!

तुलाच गाऊ, तुलाच ध्याऊ, तव दर्शन घेऊ
'कायकवे कैलास' मंत्र हा जपत सदा राहू
काजळ अवघे नभातले हे फिटून जाईल
रक्तसड्याची शिंपण इथली मिटून जाईल
शुद्ध मोकळा श्वास घेऊनि पुनः आठवु तुला...
तुझ्या रूपे श्रीबसवा, भूवरि नवा मनू आला!

**शब्दार्थ :**

डिंडिम = डंका, नगारा. मनू = मनू नामक स्मृतिकाराने ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णांचे आचरणाचे नियम लिहिले. बसवेश्वर हे समतेचे आचरण सांगणारे नव्या काळातील मनू होत. कल्याणी = कल्याण नगरात, श्रममंत्र = 'श्रम हाच कैलास' हा मंत्र, शरण = कर्नाटकातील शिवशरण, संत. अनुभावांच्या वचनप्रवाही = अनुभवांच्या वचनसाहित्याच्या प्रवाहात. कायकवे कैलास = कायक म्हणजे श्रम. श्रम करणे हाच कैलास. हा म. बसवेश्वरांनी सांगितलेला श्रममंत्र.

## ८. मन्मथा, स्वागत करितो तुझे

**नीलकंठ** (जन्म ११-९-१९६३) : ष. ब्र. नीलकंठ गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्य (धारेश्वर, जि. सातारा). प्रस्तुत गीतात संतशिरोमणी मन्मथस्वामींच्या कार्याचे नेमक्या शब्दांत वर्णन केलेले असून, प्रथम शाहीर असलेल्या मन्मथस्वामींचे गुरूपदेशानंतर संतकवीत कसे रूपांतर झाले, याचा आलेख रेखाटलेला आहे.

स्वागत करितो तुझे
मन्मथा, स्वागत करितो तुझे।।धृ.।।

कार्तिकाचे कार्य साधण्या
पंचाचार्या सहाय्य करण्या
शाहिरांना कित्ता देण्या
अवतार-कार्य ते तुझे... १

शाहिरी करूनि जगतात
केला विजय सर्व फडांत
सर्वांना दाखविला हात
ऐसी कीर्ति जगात तव गाजे... २

अपुलेचि कार्य जाणून
सद्‌गुरूंसी हात जोडून
शाहिरी दिली सोडून
डफाऐवजी टाळ साजे... ३

ज्ञानबोध, स्वयंप्रकाश जगती झळकविले
शिव-गुरुगीता लिहूनि अभंगही केले
(अन्) परमरहस्याचे गुह्य प्रकट केले
'नीलकंठ' स्मरण करी तुझे... ४

**शब्दार्थ :**

कार्तिकाचे कार्य = कार्तिक म्हणजे कार्तिकस्वामींचे कार्य (अर्थात् शिवभक्तीचा प्रसार). स्कंद-षडानन ही कार्तिकस्वामींचीच नावे. मन्मथस्वामी हे कार्तिकस्वामींचे अवतार होते, अशी पारंपरिक धारणा आहे. कित्ता = आदर्श, नमुना. ज्ञानबोध, स्वयंप्रकाश, शिवगीता, गुरुगीता, परमरहस्य = मन्मथस्वामींनी रचलेले ग्रंथ. गुह्य = गुप्त ज्ञान.

## प्रश्नावली

प्रश्न १ : खालील प्रश्नांची प्रत्येकी २० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. 'श्रमधर्माचे प्रतीक सुंदर' या गीताच्या आधारे सिद्धरामेश्वरांच्या व्यक्तिमत्त्वाचे वर्णन करा.

२. 'नवा मनू आला' असे कवी पसारकरांनी कोणाला उद्देशून म्हटले आहे? नव्या मनूने केलेली नवीन कार्ये स्पष्ट करा.

प्रश्न २ : खालील प्रश्नांची ८ ते १० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. कवी रंगनाथ जोशी यांनी आपल्या गीतातून कोणाचे वर्णन केले आहे? 'श्रीरूपाते हृदयी भरू' असे कवी का म्हणतात?

२. श्रीपलसिद्धांचा दरबार किती वर्षांपासून भरत असतो? त्यांच्या दरबाराचे तुमच्या शब्दांत वर्णन करा.

३. 'पद स्पर्शाया जाता' या कवितेताल रम्य निसर्गाचे वर्णन तुमच्या शब्दांत करा.

४. कवयित्री सौ. शकुंतला अनसिंगकर यांनी कोणत्या नाममुद्रेने आपले सर्व लेखन केले आहे? त्यांनी शिवाजवळ कोणती आगळी भिक्षा मागितली आहे?

५. कवयित्री शिवदासी यांना कोणाच्या दर्शनाचे वेड लागले आहे? त्यांच्या हृदयातील आर्त भाव तुमच्या शब्दांत स्पष्ट करा.

६. कवी नीलकंठ यांच्या दृष्टीने मन्मथेश्वरांचा अवतार कोणत्या कार्यासाठी झाला? मन्मथस्वामींनी लिहिलेल्या कोणत्या ग्रंथांचा या गीतात कवीने उल्लेख केलेला आहे?

प्रश्न ३ : खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहाः–

१. श्रमधर्माचे सुंदर प्रतीक कोणते?

२. कोणता रस चाखल्यानंतर कोणीही बेजार होत नाही?

३. श्रीकाशीजगद्‌गुरु श्रीचंद्रशेखर महास्वामीजींना पाहून भक्तांना कशाचे चिन्मय दर्शन घडते?

४. बसवेश्वरांनी कोणता मंत्र जगाला सांगितला?

५. अक्कमहादेवी मल्लिकार्जुनाला कोणती विनवणी करते?

६. कवयित्री शिवदासी ह्या कशाची ज्योत लावून शिवदर्शनाची वाट पाहात आहेत?

७. मन्मथस्वामींनी कोणते कार्य करून सर्व फडांत विजय मिळविला?



# ७ कटाव

वीरशैव कवींनी मराठीत रूढ असलेली सर्व प्रकारची रचना केलेली आहे. कटाव ही रचना आख्यानातून आढळून येते. आख्यानात ओवी, साकी, दिंडी, कटाव अशी विविध रचना करून आकर्षकता, मनोरंजकता वाढविली जाते. मराठीत अमृतराय हे कवी कटावासाठी विशेष प्रसिद्ध आहेत. कटावात भाषेचा एक ताल साधलेला असतो. जेणेकरून आख्यानाची रंगत वाढते.

सदरचा कटाव सदानंदबुवांनी लिहिलेला आहे. तो त्यांनी लिहिलेल्या गंगाधरस्वामींच्या चरित्र-आख्यानातून घेतला आहे. यात गुरुमहाराजांच्या लिंगपूजेचे, पादपूजेचे वर्णन सुमधुर शब्दांत केले असून अनुप्रासात्मक रचनेमुळे कटाव कर्णमधुर झाला आहे.

लिंगार्चना ते कैसे बसती। आसन घालुनि पाटावरती।।
भस्म चर्चिले आंगावरती। थाट पाहा किती रांगोळ्याचा।।
घमघमाट बहू उदबत्त्याचा। सुवास सुटला बेलफुलाचा।।
दोहो बाजुला समया जळती। सेवक जन ते पुढे तिष्ठती।।
पंचरत्ने बहू पंच्यामृती। स्वामी लिंगाभिषेक करिती।।
भस्म बेलफुला अर्पिती। प्राणायामी निमग्न होती।।
पेटवोनि पुढे काडवाती। कर्पुराची लावूनी ज्योती।।
पंचप्राणाची आरती करती। झांझरी आणि झांगड वाजती।।
शिवभक्तासी सावध करिती। सुमनाक्षता घेउन हाती।।
पुष्पांजळी अर्पण करिती। यापरी करित लिंगपूजा।
माऊली भक्तांची ओजा।।

**प्रश्नावली**

प्रश्न १ : खालील विषयावर प्रत्येकी १० ते १२ ओळीत टीपा लिहाः–

१. कटाव २. गुरुमहाराजांचे लिंगार्चन.

प्रश्न २ : खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहाः–

१. गुरुमहाराज कशावर अभिषेक करतात? २. भस्म, बेल व फुले अर्पण करून गुरुमहाराज कशात निमग्न होतात? ३. गुरुमहाराज कोणास सावध करतात? ४. हातात सुमनाक्षता घेऊन गुरुमहाराज काय अर्पण करतात? ५. पूजेच्या वेळी कशाकशाचा सुवास सुटला आहे? ६. पूजेत कोणकोणत्या वातींचा उपयोग केला आहे? ७. या कटावात कोणत्या वाद्यांचा उल्लेख आला आहे?

# ८ वडप

वडप किंवा व्हडप हा खास वीरशैव गीतप्रकार आहे. तो वेगवेगळ्या भागांत वेगवेगळ्या नावाने परिचित आहे. कन्नडमधील वचनावरून याची निर्मिती झाली आहे. कन्नडमध्ये वीरभद्रवचन म्हणून जो प्रकार आहे त्यावरून मराठीत हा रचला गेला आहे. ही वडपे लग्नसमारंभात गुग्गळपूजेच्या वेळी म्हटले जातात. यासाठी गुग्गळपूजेची पार्श्वभूमी, इतिहास जाणून घेणे आवश्यक आहे.

ज्यांचे कुलदैवत वीरभद्र आहे असे कुटुंबीय हा विधी करतात. महाराष्ट्रात तो वेगवेगळ्या नावाने ओळखला जातो. गुग्गळ, खापरीपूजा, धूप जाळणे अशी याला नावे आहेत. मातीच्या दोन घागरी आणून त्यांची बुडे फोडतात व तोंडाकडील भाग पालथा ठेवून त्यात राख भरतात. बाजूला कणकेचे गोळे बाजूने लावतात. नंतर तेलात बुडवलेल्या चिंध्यांचे काकडे करतात. मध्यभागी छिद्र करून त्याला एक खुंटी रोवतात. खुंटीच्या भोवती हे काकडे लावतात. अशा तयार केलेल्या माठाला रंगवतात. त्याला फुलमाळा लावतात. हे दोन कुंभ जंगम किंवा नव-या मुलांचे नातेवाईक वाजत गाजत गावात मिरवत असतात. घराबाहेर गेल्यानंतर चौकाचौकात सर्व समुदायासह व्हडप/वडप म्हणतात. तो एक पथनाट्यासारखाच प्रकार असतो. व्हडप म्हणणारा एक चरण म्हणतो व थांबतो. त्यावर सर्व सहप्रवासी ॐ नमः शिवाय म्हणतात. पुन्हा दुसरे चरण म्हणतात. सर्व सहप्रवासी ॐ नमः शिवाय म्हणतात.

मध्येच पूजा होऊन नवरा, नवरी, जवळचे आप्त ह्यांना शस्त्राद्वारे जिभेवर, गालावर टोचण्यात येते. शस्त्रे अगदी आरपार टोचण्यात येतात. काहीच इजा होत नाही. गुग्गळ घेऊन नाचणारे बेभान होऊन नाचतात. असे ३-४ चौकांत कार्यक्रम होतात. नंतर महादेवाच्या किंवा मारुतीच्या देवळात किंवा मठात याचे विसर्जन होते. तेथे नारळ फोडून नारळ, हरब-याची दाळ यांचा प्रसाद वाटला जातो. गुग्गळ कुंभ तेथेच ठेवून मिरवणूक परत येते.

हा सर्व विधी वीरभद्र देवाच्या नावाने केला जातो. यात एका प्राचीन कथेचे बीज दडलेले आहे. पुराणकाळी दक्षाने यज्ञ केला होता. यज्ञात सर्व देव बोलावले होते. मात्र मुद्दामच महादेवाला त्याने बोलावले नव्हते. माहेरचे कार्य आहे, वडील विसरले असतील म्हणून सती विनाआमंत्रणाची यज्ञठिकाणी जाते. तेथे पार्वतीचा अपमान होतो. महादेवाने अगोदरच पार्वतीला 'जाऊ नको' असे सांगितलेले असते. त्यामुळे महादेव रागावतात.

त्यांनी समोर जटा आपटताच त्यातून वीरभद्र जन्मतो. वीरभद्राला महादेव आज्ञा करतात. वीरभद्र तेथे जाऊन शिवनिंदा करणा-या दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करतो. त्याचे स्मरण म्हणून शस्त्र टोचण्याचा विधी यात समाविष्ट आहे. व्हडपामध्ये वीरभद्राच्या शौर्याचे वर्णन असते.

तसेच नंतर वीरभद्राने शरभ अवतार घेऊन उन्मत्त झालेल्या नरसिंहाचा संहार केला. त्यावरही वडपातून वर्णन आलेले आहे. वडप हे लोककाव्य आहे. त्यामध्ये नाट्य आहे तसे ते दृश्यकाव्य नाटक अशा अनेक अंगाने प्रदर्शित केले जाते. थोडक्यात ते वीरभद्राच्या नावाने केलेले गणाचाराचे उत्कृष्ट उदाहरण आहे. हे लोकगीतवजा असल्यामुळे ते कोणी रचले याचे क्वचित् उल्लेख आढळतात. नागलिंग (अज्ञात) व शंकरमृगेंद्र यांचे मुद्रिकेत नाव असलेले व्हडप उपलब्ध होतात. अलीकडे यात निरर्थक रचनाही सादर होतात. कारण वडप रचणारे लोक आता नाहीत.

येथे मोजकी व अर्थपूर्ण अशी ५ व्हडपे निवडली आहे. त्यांत वीरभद्राच्या अतुलनीय शौर्याचे वर्णन आले आहे. तसेच कर्नाटकातील प्रमुख वीरभद्रस्थान 'येडूर'– जेथे दक्ष-यज्ञविध्वंस झाला ते ठिकाण– याचेही वर्णन आलेले आहे. तसेच वीरभद्राच्या शरभावताराचे वर्णन पण यात आले आहे. हे वर्णन वीरश्रीयुक्त असून याचे सादरी-करण पहाण्यासारखे असते.

महाराष्ट्रात कासोद (ता. आकोट, जि. अकोला), शहाडोंगर (ता. जि. अहमदनगर), मुखेड (जि. नांदेड) व कर्नाटकात अनेक ठिकाणी वीरभद्राची स्थाने प्रसिद्ध असून त्यांच्या मोठमोठ्या यात्रा भरतात.

**शंकर मृगेंद्र** (अंदाजे कालखंड १९ वे शतक) : अमरावतीच्या विरक्त मठाचे अधिकारी पुरुष. यांच्या अभंगाचा गाथा वारद ग्रंथमालेत प्रसिद्ध झाला आहे. यांनी महाराष्ट्रात अमरावती येथे प्रथम बसवजयंतीची सुरुवात केली. यांनी रचलेला एक वडप येथे घेतला आहे.

## वडप / व्हडप

१.

वीरभद्र मोठा वीर। बारा लिंगाचा अवतार।।
राहिला उभा सांबासमोर। सांबाने हुकूम केला।।
आपण जावे दक्षाच्या नगरा। अहं म्हणून अहंकार केला।।

कुंड मंडपाचा विध्वंस केला। उडविले दक्षाचे शिर।।
पुष्प वर्षती सुरवर। भक्त करिती जयजयकार।।
।। कर्ण शिवा कर वीरभद्रा।।

२

येडूर नगर थोर। तेथे नांदतो वीरभद्रदेव।।
झाडून झुडून जागा दिली। तीन दांड्या नऊ खुंट्या।।
रत्नजडीत सिंहासन। त्यावर बैसे आपण।।
एक एक नवस करिती आगळ। कोणी घेती धूप गुग्गळ।।
कोणी उतरून ठेवितो शिरकमळ। कोणी घेती शस्त्र टोचून।।
।। कर्ण शिवा कर वीरभद्रा।।

३

वीरभद्रस्वामी केवळ। भक्त काढिती गुग्गळ।।
भक्त मिळोनी प्रेमळ। हाती घेऊनिया गुग्गळ।।
वर तुटती अग्नीचे ज्वाळ। ऐसा वीरशैव थोर।।
दैत्य मारून केला संव्हार। कोठवरी सांगू याचा विस्तार।।
नागलिंग बोले सत्वर। झोड लावावी वै-यावर।।
।। कर्ण शिवा कर वीरभद्रा।।

४

अहा रे वीरा। अहा रे शरभा।।
नरसिंहाचा अवतार भला। प्रगटवी मुखाने ज्वाळा।।
तेणे त्रिभुवनी प्रलय केला। म्हणोन शरण त्या शिवाला।।
गेले सुरासुर वर। म्हणे मृगेंद्र शंकर।।
।। कर्ण शिवा कर वीरभद्रा।। कालांतक रुद्रा।।

५

अहा रे वीरा। अहा रे शरभा।।
नारसिंहाचा गर्व गाढा। वीरभद्र करी चुराडा।।
धरोनि शरभ अवतार। नरसिंहाचे तोडी शिर।।
तेणे देव करिती जयजयकार।।
।। कर्ण शिवा कर वीरभद्रा, कालान्तक रुद्रा।।

**शब्दार्थ :**

येडूर = ता. अथणी, जि. बेळगाव येथील वीरभद्राचे प्रसिद्ध स्थळ. दक्ष = पार्वतीचा पिता. तीन दांड्या = तीन काळ. नऊ खुंट्या = नऊ ग्रह. शरभ = वीरभद्राचा अवतार. याने नरसिंहाचे गर्वहरण केला, अशी पुराणकथा आहे.

## प्रश्नावली

प्रश्न १ : खालील प्रश्नांची प्रत्येकी ८ ते १० वाक्यांत उत्तरे द्याः–

१. तुम्ही पाहिलेल्या गुग्गळ कार्यक्रमाचे वर्णन लिहा.

२. तुम्हाला माहीत असलेल्या वीरभद्र-स्थानाचे वर्णन करा.

३. तुम्हाला पाठ असलेले एखादे 'वडप' लिहा.

प्रश्न २ : खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्याः–

१. वीरभद्र कोणाचा मुलगा आहे?

२. वीरभद्राने कोणाच्या यज्ञाचा विध्वंस केला?

३. दक्ष कोण होता?

४. महाराष्ट्रातील वीरभद्र-स्थळांची नावे लिहा.

५. गुग्गळाच्या वेळी कोणते गीत गातात?

प्रश्न ३ : 'वडप' या कविताप्रकारावर १० ते १२ ओळींत टीप लिहा.



# ९ भारूड

मराठी वीरशैव संतकवींनी रूपके अर्थात भारुडेही लिहिली आहेत. मन्मथस्वामी, लिंगेश्वर, शिवदास, लक्ष्मण, सदानंद, चन्ना आदी कवींची भारूडरचना उपलब्ध झाली आहे. भारूड हा गेय काव्यप्रकार आहे तसाच अभिनेयही आहे. भारूड गाताना ते साभिनय सादर करण्याची प्रथा आहे. सांसारिक, व्यावहारिक जीवनातील संकल्पनांचा परमार्थक्षेत्रात वापर करणे म्हणजेच रूपक अथवा भारूड होय. 'भारूड म्हणजे बहुरूढ रचना' अशी भारुडाची व्याख्या केली जाते. मराठवाड्यात अशा रचनेला 'गबाळ' अशीही संज्ञा आहे.

## १. जोहार

**मन्मथस्वामी** (इ. स. १५६१–१६१३) : मन्मथस्वामींचा हा एक 'जोहार' आहे. धन्याचा निरोप पोहोचविणारा महार जोहार घालून, नमस्कार करून संबंधिताला निरोप देत आहे, असे या जोहाराचे स्वरूप आहे. हा कैलासनगरीचा म्हणजेच शंकराचा महार जीवात्म्यांना स्वतःचे हित करून घेण्यासंबंधी सांगतो. दुर्व्यसने करू नका, कामक्रोधाचे दमन करा, मद-मत्सर-आशा यांचे दंडन करा, तरच तुम्हाला आत्मसुख मिळेल, असा इशारा तो देत आहे. अज्ञानाचा अंधार नाहीसा झाला की अहंकार नाश पावतो, ज्याचा अहंकार नष्ट होतो त्याची घोर संसारातून सुटका होते व त्याला शिवपद प्राप्त होते, असा संदेश या भारुडात दिलेला आहे.

जोहार जी मायबाप जोहार। मी कैलासनगरीचा महार।
त्या नगरीचा सर्व विचार। मजकडे की जी मायबाप।।१।।

मी तुमच्या अर्ध्या घासाचा महार। अखंड द्वारी करून जोहार।
नगरीची झाडझुड मज चाकराकडे की जी मायबाप।।२।।

दहा दरवाज्याची पहाणी। सर्व इंद्रियाची झाडणी।
संताचे चरणी सर्व सांडून लागलो की जी मायबाप।।३।।

धन्यावीण सर्वथा। क्षणभर न चाले मायबापा।
त्याचेमुळे सर्व लोका विनंती करून सांगतो की जी मायबाप।।४।।

महाराने विनंती केली परी ती आत्मरूपी भुलली।
मायेने फासाटी केली। म्हणून भयभीत झालो की जी मायबाप।।५।।

अहंकाराने बुडविले। विवेकाने धीक्कारिले।
मूळ आसनी बैसविले। (तेव्हा) इंद्रियासी बंधन केले की जी मायबाप।।६।।

तुमचे कृपे बोलिलो आत्मज्ञान। आणखी सांगेन ते ऐका की जी मायबाप।।७।।

आता तुम्ही सकळीक जणी। नका पडू दुर्व्यसनी।
महा प्रपंचाची जाचणी। दूर करा की जी मायबाप।।८।।

आपआपणाते न मानावे। कामक्रोधाते दंडावे।
मदमत्सरा खंडावे। तरीच पावाल परमसुख की जी मायबाप।।।।९।।

आशा मनिषा कल्पना। दंडावे इंद्रियमना।
तरीच आत्मसुखा पावाल की जी मायबाप।।१०।।

असे जे नेमी राहिले। ते आत्मसुखा पावले।
जे आचारा भंगले त्यास लाधले दुःख जाणा की जी मायबाप।।११।।

मग घातले लोटांगणे। पूर्वी अधिक अथवा उणे।
तुज बोलिलो धाकुटपणे। तो अपराध क्षमा करा की जी मायबाप।।१२।।

ऐसा महार बोलीला। अज्ञान-अंधःकार निरसला।
ज्ञानमय प्रकाश झाला। फिटला अहंभाव की जी मायबाप।।१३।।

मन्मथ म्हणे जोहार सार। याचा जाणिजे भेदविचार।
त्याचा तुटे घोर संसार। शिवपदा जाईल की जी मायबाप।।
जोहार मायबाप जोहार।।१४।।

**शब्दार्थ :**

दहा दरवाजे = कर्ण, त्वचा, नेत्र, जिव्हा व घ्राण ही पाच ज्ञानेंद्रिये आणि हात, पाय, वाणी, शिश्न व गुदा ही पाच कर्मेंद्रिये म्हणजे दहा दरवाजे. मूळ आसनी = गुदद्वार व जननेंद्रिय यांच्या मधल्या भागात पायाची टाच लावून मूळबंध साधतात. त्यामुळे गुदद्वार बंद होते. याला योगशास्त्रात मूळ आसन म्हणतात. कुंडलिनीजागृतीसाठी या आसनाचा उपयोग होतो. नेमी राहणे = इंद्रियदमनाचा नियम पाळणे. फासाटी करणे = कांटेरी फांद्या टाकून अडचण करणे.

## २. फुगडी

**लिंगेश्वर** (ज. अंदाजे इ. स. १५७८-१६३८) : दोन स्त्रिया एकमेकींचे हात धरून वर्तुळाकार फिरत नाचतात त्याला फुगडी म्हणतात. फुगडी खेळताना म्हटलेले हे गाणे. लिंगेश्वररचित ह्या फुगडीत पारमार्थिक उपदेश केलेला आहे. जिचा कासोटा बळकट आहे म्हणजे जिचे चारित्र्य स्वच्छ आहे, पण जी परमार्थ करताना निर्लज्ज (धाडसी) होऊ शकते अशी स्त्रीच (जीव) कैलास गाठू शकते. म्हणून सावध चित्ताने शिवस्मरण केले पाहिजे. संतांसोबत फुगडी खेळत फिरलो तर जन्माजन्मांतील फिरणे थांबते, जन्मफेरा खुंटतो,असा या फुगडीचा आशय आहे.

फुगडी फू गे मनमळ धु गे। संता शरण जा गे। ब्रह्मरूप हो गे।।
फुगडी घ्याल ठाई। सम डोल देही। विषम पोरी भागली।
निर्धार करून पाहिली।।
गुरुभक्ताची फुगडी। निर्लज्य मांडी उघडी। कासुटा बळकट तेडी।
घेणे कैलासाला उडी।।
गुरुभक्तिविण। तिचा जन्म व्यर्थ जाण। सावध करूनी मन।
करी शिवस्मरण।।
भक्ति बहू गोड भेद जिंकीयला बाई। अभेद अंत्यसुख आहे शिवराजपायी।।
संतसमागमे सख्या गेल्या निजघरा। गुरुकृपा लिंगय्याशी नाही जन्मफेरा।।

**शब्दार्थ :**

मनमळ = मनातील मलिनता, विकार. निजघरा = मूळ घरात, जीव जेथून या संसारात आला त्या मूळ ठिकाणी म्हणजेच आत्मरूपात.

## ३. शरणार्थ

**लिंगेश्वर** (ज. अंदाजे इ. स. १५७८-१६३८) : मन्मथस्वामींचे शिष्य. राहणार बार्शी. यांचे ५०-६० अभंग व काही भारुडे प्रकाशित झाली आहेत. लिंगेश्वरांची रचना प्रासादिक व अलंकारिक आहे. यांची समाधी बार्शी येथे आहे.

शिवभक्त भेटले म्हणजे एकमेकास 'शरणार्थ' करतात. शरणार्थ म्हणजेच नमस्कार. शरणार्थ केल्यास परस्परांचे क्षेमकुशल विचारले जाते, काही बोलणे होते. लिंगेश्वर येथे शरणार्थ करून कपिलधार या मन्मथस्वामींच्या समाधिस्थळाविषयी माहिती देत आहेत.

कपिलधारचे महत्त्व, कार्तिक महिन्यातील यात्रा, सांसारिकास घडणारा परमार्थ यांचे नेमके उल्लेख येथे आलेले आहेत.

शरणार्थ करितो मनोभावे शिवभक्तास।
तेणे आनंद होईल सर्वांचे चित्तास।।१।।

तुम्ही शिवनामाचा करून गजर। दणाणिला ब्रह्मांड डोंगर।
वाटे भूकैलास कपिलाधार। गुरुघर निर्मियले।।२।।

नित्यनेम कार्तिकमासी। यात्रा भरत पोर्णिमेशी।।
शिवभक्त अविनाशी। भेट देती कृपाळू।।३।।

त्याचा आम्हा मस्तकी उपकार। थोर झाला अनिवार।।
संसारसुखाचा बाजार। हटला जाण पंचरात्री।।४।।

करिता कपिलधारेशी स्नान। दोष जाती रानोरान।।
शुद्ध राहणे पवित्र मन। शिवस्मरण घडतसे।।५।।

संसारिकास हा परमार्थ। घडला जाण यथार्थ।।
यमराजाचा टळला अनर्थ। म्हणून लिंगय्या करितो शरणार्थ।।६।।

**शब्दार्थ :**

भूकैलास = पृथ्वीवरील कैलास अर्थात कपिलधारक्षेत्र. पंचरात्री = पाच रात्री. कपिलधारला पाच रात्री घालवण्याचा नेम आहे. यमराजाचा अनर्थ टळणे = मृत्यूपासून सुटका होणे.

## ४. ताकीदपत्र

**शिवदास** : हे मन्मथस्वामींचे समकालीन शिष्य होते. यांनी मन्मथस्वामींची लिहिलेली आरती प्रसिद्ध आहे. तसेच भारुडे, ताकीदपत्रेही लिहिली आहेत. शिवदास नावाचे अनेक कवी होऊन गेले. अभंगकार शिवदास नेमके कोण, याबद्दल संशोधकांत मतभेद आहेत.

ताकीदपत्र याचा अर्थ समज देणे. राजाकडून गावच्या पाटील-कुलकर्ण्याला नीट वागण्याविषयी, गावाचे हित पाहण्यासंबंधी समज दिली जात असे. शिवदासकृत प्रस्तुत ताकीदपत्रात देहरूपी गावात राहणा-या मनाजीपंत कुलकर्ण्यास (मनाला) ताकीद देण्यात आली आहे. मनाजीपंताने गावाची फार खराबी केली, परमार्थाच्या वाटा बंद केल्या,

म्हणून तुम्हाला धरणे येईल अशी भीती घातली आहे. शिव शिव असा उच्चार केल्यावर मात्र काही उणे पडणार नाही, असे सांगितले आहे. वीरशैव संतांनी विविध प्रकारे शिवनामाचे महत्त्व कसे सांगितले आहे याचा हा एक नमुना होय.

ताकीदपत्र राजश्री मनाजीपंत कुलकर्णी।। मुक्काम देहनगर यासी।।
जीवाजी शिवाजी मनपूरवाले।। शरण शरणार्थ विनंती विशेष।।
ताकीदपत्र देण्यास कारण की तुम्ही या गावचा फार खराबा केला आहे।।
तर ज्यावेळी तुम्हास धरणे येईल। त्यावेळेस तुम्ही कोणाचे नाव सांगाल।।
जीवाजी म्हणे देह कर्ता करविता। मी उगाच डौले मिरविता।
क्रोध भरी सार माझे पदरी चूक नाही।। प्रपंच मोठा तेणे बुडविल्या परमार्थाच्या
वाटा। मत्सर हा खोटा मद म्हणे तू गोमटा। परी ताकीद देतो।
तुम्ही एकमेकास भेटा। परी सद्‌गुरू घरी नाही वाटा। आम्ही पळालो दारवंटा।।
एकाएक खुंटा हाती धरिला।। पायगाव पळाले हातगाव गळाले।
कानगाव मिळाले। डोळसवाडी भिंत झाली।। दंताळवाडीने बातमी दिली।
मजकडे काही नाही आता।। मोठमोठ्याच्या ऐशापरी।।
गरीब बिचारे राहिले फिरी।। पदरी कोणी मनुष्य नाही म्हणुनिया।।
मोठमोठ्यांचे ऐसे हाल। गरीब म्हणे मी खुशाल।। शिवशिव जिव्हे बोल।
मग तुज काय उणे।। अशी ताकीद देऊन गेला।।
शिवशिव माया ब्रह्मी उरला।। शिवदास स्वरूपी मुरला।। ताकीद देतो।।

## ५. पिंगळा

**लक्ष्मण** (इ. स. १८०८ ते १८७८) : लक्ष्मण महाराज रऊळगावकर यांचे चरित्र पूर्वी आले आहेच. पिंगळा भविष्यकथन करतो, अशी लोकसमजूत आहे. जुन्या काळी भविष्य सांगणारा मनुष्य पिंगळ्याप्रमाणे झाडावर बसून भविष्यकथन करीत असे. लक्ष्मणमहाराजांनी या रचनेत कलियुगात कोणकोणते अनर्थ होतील याचे भविष्य वर्तविले आहे. सत्याचा लोप होऊन असत्याला महत्त्व येईल, मुलगा बापाला आणि पत्नी नव-याला मारील, शिष्य गुरूचा वध करील, अतिवृष्टी होईल, अनावृष्टी होईल. महामारी होऊन तरुणांना, बालकांना खाऊन टाकील इत्यादी. आपल्या अवतीभोवती घडणा-या घटनाच कवीने येथे चित्रित केल्या आहेत असे वाटते.

पिंगळा गजबजिला महाद्वारी तो ऐका। टाकून सांगतो लोका।
पिंगळा गजबजिला।।धृ.।।

काळ आला दुर्धर। धर्म बुडेल फार।
फार होतील जार चोर। अल्प आयुषी नर।।१।।

सत्य ते लोपेल। होईल असत्या मोल।
वर्णा संकर होतील। उन्मत्त कोल।।२।।

लेक मारील बापाला। स्त्री भ्रताराला।
शिष्य वधील गुरूला। मोठा दिसे हा घाला।।३।।

अतिवृष्टी अनावृष्टी। लोक होतील कष्टी।
फार दुःख भोगतील। धामधूम ती मोठी।।४।।

आता जे जन्मतील। दुःखरूपी ते प्राणी।
अवघा बाजार खोट्याचा। कोणी क्वचित् ज्ञानी।।५।।

मरी आली आली पहा। भक्षी ती तरुणाला।
मुले बाळे ही भक्षिती। दया नाही हो तिला।।६।।

वृद्ध म्हातारे रडती। न भक्षी हो त्याला।
लक्ष्मण विनवी। स्मरा स्मरा निजप्रभूला।।७।।

## ६. नवरा

**चन्ना** (इ. स. १८७४ ते १९३७) : चन्नप्पा शिवबसप्पा वारद हे मूळचे राहणारे नळेगावचे. यांनी अभंग, पदे, दोहरे, आरत्या वगैरे भरपूर लिखाण केले. त्यांच्या अभंगाचा गाथा १९२६ साली प्रकाशित झाला असून आणखी काही रचना अप्रकाशित आहेत. त्यांची समाधी भातखेडा (ता. जि. लातूर) येथे मांजरा नदीच्या काठावर आहे. आषाढी एकादशीच्या दिवशी त्यांचे कुटुंबीय पुण्यतिथी साजरी करतात.

चन्नाची ही एक बहारदार रचना आहे. नवरा म्हणजे ईश्वर, शिव. तो आपल्या हृदयातच वसलेला आहे, परंतु त्याची कधीच गाठ पडत नाही. जीव हा सती आणि शिव हा पती असा सतिपतिभाव वीरशैवधर्मात आचरिला जातो. त्यावर हे रूपक आधारलेले आहे.

नव-याचे दर्शन व्हावे म्हणून मी (जीव) सर्व खटपट करते. होमहवन करते, जप-तप-दान करते. पण तो इतका लाजाळू आहे की कधी समोरच येत नाही, अशी तक्रार बायको करीत आहे. ज्याची जन्मभरात कधीच गाठ पडत नाही अशा नव-याशी संसार करणारीही ही बायको औरच म्हणावी लागेल.

बाई मी मायाळू ग मायाळू। नवरा मोठा लाजाळू।।धृ.।।

ज्यासी नाही घरदार। तो म्या योजिला स्वयं वर।
त्याच्या संगे करिते संसार।।१।।

माया करिते नव-यावरी। नवरा लाजून पळतो दूरी।
गाठ पडेना जन्मवरी।।२।।

नव-यासाठी होमहवन। नव-यासाठी जपतपदान।
नव-यासाठी हिंडते रानोरान।।३।।

चन्ना म्हणे नवरा नवरी। न येती एकमेकासामोरी।
खेळ खेळतो नानापरी।।४।।

## ७. व्यभिचारिणी

**सदानंद** (अंदाजे इ. स. १८८०–१९४०) : सदानंदबुवा जोडजवळेकर यांचे चरित्र पूर्वी आले आहेच. स्वधर्माचा त्याग करून परधर्माचे आचरण करणे हा व्यभिचार होय. नव-याशी प्रतारणा करून परपुरुषाशी रममाण होणे हा पतिव्रताधर्म नसून वेश्यावृत्ती आहे. म्हणून जे वीरशैव इष्टलिंग विसरून, परधर्माचरण करतात अशांचा जळजळीत धिक्कार सदानंदांनी येथे केला आहे. 'थूऽ रांड थूऽ तुझ्या तोंडावर थूऽ' या शब्दांतून ह्या निषेधातला प्रखरपणा लक्षात येतो. या रचनेचा बाजच वेगळा आहे.

थूऽ रांड थूऽ तुझ्या तोंडावर थूऽ।।
परधर्म अभिलाषी व्यभिचारिणी तू।।धृ.।।

ज्याचे संगे लग्न केले, सुख नाही बोला।
बळे जाशी लोकापाशी। घर देसी त्याला।।१।।

दाने नसता भांडून मागे आपल्या नव-याला।
पलंगावरी सुख देई, पहा आणिकाला।।२।।

सद्‌गुरूने लिंग देता जातीमध्ये आला।
असा त्याचा उपकार मोठा, विसर कसा झाला?।।३।।

अंग सती लिंग पती वीरशैवा झाली।
अलिंगीसी शरण जाशी लाज कोठे गेली?।।४।।

सदानंद हात जोडी विनवी लिंगी लोका।
लिंगभक्ती सोडूनिया बोंबा मारू नका।।५।।

**शब्दार्थ :**

अंग सती लिंग पती = अंग म्हणजे जीव. जीव हा शिवाची पत्नी, सती आहे. लिंग म्हणजे शिव. शिव हा जीवाचा पती आहे. अशा भावनेने उपासना करणे म्हणजे 'सतिपतिभाव' होय.

## प्रश्नावली

प्रश्न १ : खालील प्रश्नांची प्रत्येकी २० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. 'जोहार' या भारुडातील संदेश तुमच्या शब्दांत स्पष्ट करा.

२. लिंगेश्वरांच्या 'फुगडी' आणि 'शरणार्थ' या भारुडांतील आशयाचे तुमच्या शब्दांत वर्णन करा.

प्रश्न २ : खालील वाक्यांतील रिकाम्या जागी कंसात दिलेल्या शब्दांपैकी योग्य शब्द लिहून वाक्ये पुन्हा लिहाः–

१. मी तुमच्या ....... घासाचा महार (दोन / अर्ध्या)

२. ....... प्रकाश झाला। फिटला अहंभाव की जी मायबाप।।
(सुखमय / ज्ञानमय)

३. संतसमागमे सख्या गेल्या .......। (निजघरा / परघरा)

४. बाई मी मायाळू ग मायाळू। नवरा मोठा ....... । (लाजाळू / कृपाळू)

प्रश्न ३ : खालील प्रश्नांची प्रत्येकी ८ ते १० वाक्यांत उत्तरे लिहाः–

१. शिवदासांनी 'ताकीदपत्र' या भारुडातून कोणती ताकीद दिली आहे?

२. लक्ष्मणांनी आपल्या भारुडातून कोणते भविष्य वर्तविले आहे?

३. 'शरणार्थ' या भारुडाच्या आधारे 'कपिलधार' या स्थळाचे वर्णन करा.

४. 'नवरा' आणि व्यभिचारिणी' या भारुडांतील आशय तुमच्या शब्दांत विशद करा.

